# जन्म हा अखेरचा

भाग पहिला

('सिद्धान्तशिखामणी' ग्रंथातील भक्तस्थलावरील आशीर्वचने)


श्रीकाशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

काव्य-सर्वदर्शनतीर्थ, वेदान्ताचार्य, विद्यावारिधि, विद्यावाचस्पति

**श्री १००८ जगद्गुरु डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

जंगमवाडी मठ, श्रीक्षेत्र काशी

संकलन / संपादन

**डॉ. शे. दे. पसारकर**

एम्.ए.,पीएच्.डी



**शैवभारती भवन**

**जंगमवाडी मठ, वाराणसी**

**१९९३**

जन्म हा अखेरचा (मराठी) भाग-१
श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी
JANMA HA AKHERACHA (Marathi) Part-I
By Shri Kashi Jagadguru Dr. Chandrashekhar Shivacharya Mahaswamiji

प्रकाशक : कार्यवाह,
शैवभारती भवन, वाराणसी.

प्रथमावृत्ती : २५ ऑगस्ट १९९१
प्रती : ५०००
द्वितीयावृत्ती : ३ जुलै १९९३
प्रती : ५०००


मूल्य : -पंधरा रुपये

अक्षर जुळणी / मुद्रण :
गणेश फोटो टाईप सेटर्स,
३७४, उत्तर कसबा, सोलापूर-४१३ ००७

मुखपृष्ठ : शिरीष घाटे

ग्रंथ उपलब्धिस्थळे
१. व्यवस्थापक, शैवभारती भवन,जंगमवाडी मठ,
वाराणसी (उ.प्र.) २२१००१
२. श्री. बाबूराव मैंदर्गीकर, ३७४ उत्तर कसबा, जयंती पेपर्स ॲन्ड प्रिन्टर्स,
सोलापूर (महाराष्ट्र)-४१३ ००७ ☎ २४४१५

# संपादकीय निवेदन

गेल्यावर्षी श्रावणमासात श्रीसिद्धेश्वर योगीनाथ भक्तमंडळ व श्रीसिद्धेश्वर देवस्थान पंचकमेटी यांच्या वतीने प.पू.काशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचा अड्डपालखी-महोत्सव व श्रावणमासानुष्ठान आयोजित केले होते. त्यावेळी वीरशैव साहित्य संशोधन मंडळ, सोलापूर यांच्या वतीने 'सिद्धान्तशिखामणी' या ग्रंथाचे प्रकाशन झाले. प.पू. महास्वामीजींची रोज कन्नडमधून मंत्रमुग्ध करणारी रसाळ आशीर्वचने होत असत. 'दै.संचार'चे संपादक श्री.रंगाअण्णा वैद्य यांनी आशीर्वचनांचे वृत्तसंकलन करण्याची जबाबदारी माझ्यावर सोपवली. माझ्या कुवतीप्रमाणे मी ती पार पाडली. अनेकांनी आग्रह धरल्यामुळे ती आशीर्वचने पुस्तकाच्या रूपात आज प्रकाशित होत आहेत. 'जन्म हा अखेरचा' या पुस्तकाची ही जन्मकथा.

वृत्तसंकलनाच्या निमित्ताने प.पू. डॉ.चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा संजीवक सहवास लाभला. अनेक वेळा त्यांचे समतोल विचार आणि दर्शनशास्त्राचा सखोल व्यासंग पाहून मी मुग्ध झालो. वृत्तसंकलन काय कोणीही केले असते. परंतु जसजसा त्यांचा सहवास अधिकाधिक लाभत गेला तसतशी माझी खात्री होत गेली की वृत्तसंकलनाचे कार्य भाग्यानेच माझ्या वाट्याला आले आहे. त्यांचे विचार ग्रथित करताना मी जसा आतून फुलत गेलो तसा वरून शहारतही गेलो. त्यांचा लाभलेला अमृतस्पर्श हा माझ्या आयुष्यातला अमूल्य ठेवा आहे.

ही सर्व आशीर्वचने षट्स्थलांपैकी फक्त 'भक्तस्थला'तील पंधरा स्थलांवरची आहेत. ती साररूपाने या पुस्तकात आली आहेत. 'सिद्धान्तशिखामणी'तील स्थलांचे तात्त्विक विवेचन आणि त्यानिमित्ताने प.पू. महास्वामीजींनी केलेले चिंतन असे या आशीर्वचनांचे स्वरूप आहे. मूळ लेखन वृत्तपत्रासाठी असल्याने येथे त्याचे थोडे परिष्करण केले. शीर्षके बदलली. संदर्भ देताना केवळ 'सिद्धान्तशिखामणी'तील श्लोकांचेच संदर्भ दिले. जिज्ञासूंनी तो विषय मुळातून पाहावा अशी अपेक्षा आहे. मनुष्य एकदा 'भक्त' झाला की त्याचा जन्म-मृत्यूचा प्रवास थांबण्याची वेळ आली,असे अध्यात्मशास्त्र मानते. ही 'भक्त' या स्थलावरची आशीर्वचने आहेत. म्हणून एका आशीर्वचनाला दिलेले 'जन्म हा अखेरचा' हे अन्वर्थक शीर्षकच या ग्रंथाला दिले.

हा ग्रंथ एवढ्या लवकर प्रकाशित होत आहे तो नागपूरचे श्री.रा.ग.रामापुरे यांच्यामुळे. त्यांनीच या श्रावणात नागपूरला हा ग्रंथ प्रकाशित करावा, असा आग्रह धरला. म्हणून त्यांचे विशेष आभार मानायला हवेत.

'दै.संचार'चे संचालक श्री.मेघराज काडादी व श्री.धर्मराज काडादी आणि

संपादक श्री.रंगाअण्णा वैद्य यांचे सहकार्य मोलाचे आहे. त्यामुळेच प्रथम वृत्तसंकलन आणि त्यातून आज ग्रंथनिर्मिती झाली आहे. त्यांचे मन:पूर्वक आभार.

नागपूरचे श्री.संभाप्पा सागोळे यांनी उदारपणे तात्काळ द्रव्यसाहाय्य केले. त्यामुळेच एवढ्या अल्प मूल्यात हा ग्रंथ वाचकांच्या हाती देणे शक्य झाले. याकामी श्री. सिद्धय्या हिरेमठ, सोलापूर यांचे सहकार्य मिळाले. दोघांचेही आभार. आमचे मित्र आणि कार्यकर्ते श्री.गणेश शेट्टी व श्री.बाबूराव मैंदर्गीकर यांचे सहकार्य तर सातत्याने मिळत असते. श्री.शेट्टी यांच्या निवासस्थानीच प.पू. जगद्‌गुरूंच्या साक्षीने आशीर्वचनांचे परिष्करण झाले. याशिवाय श्री.बसवराज शास्त्री हिरेमठ, वीरशैव साहित्य संशोधन मंडळाचे पदाधिकारी व सदस्य आणि ज्यांचे प्रत्यक्षाप्रत्यक्ष सहकार्य मिळाले त्या सर्वांचा मी आभारी आहे.

या निमित्ताने 'संचार परिवारा'शी स्नेहबंध जुळला ही माझी कमाई. ग्रंथात काही उणीव दिसली तर ती माझी आणि 'जाणीव' दिसली तर ती पूज्य जगद्‌गुरूंची, एवढे अवधान ठेवावे ही प्रार्थना.

**शे.दे.पसारकर**

'उषास्वप्न'
१२६ब, मार्कंडेय नगर,
सोलापूर - ४१३००३.

## दुसऱ्या आवृत्तीविषयी

१९९१ मध्ये 'जन्म हा अखेरचा' हा पूज्य श्रीकाशीजगद्‌गुरूंच्या आशीर्वचनांचा संग्रह प्रकाशित झाला. त्यानंतर 'जन्म हा अखेरचा' या नावाने 'श्रीसिद्धान्तशिखामणी'तील प्रत्येक स्थलावरील आशीर्वचनांची मालिका गुंफावी अशी कल्पना सुचली. त्याप्रमाणे जन्म हा अखेरचा भाग २ व भाग ३ हे ग्रंथ प्रकाशित झाले. या ग्रंथांना महाराष्ट्रात अत्यंत लोकप्रियता लाभली. दोन वर्षातच 'जन्म हा अखेरचा (भाग १)' ग्रंथाची ५००० प्रतींची आवृत्ती संपली. परंतु वाचकांची मागणी असल्यामुळे या ग्रंथाची द्वितीयावृत्ती आज प्रकाशित होत आहे.

प. पू. श्रीकाशीजगद्‌गुरूंची आशीर्वचने महाराष्ट्रात लोकप्रिय होत आहेत. या पुढील भागदेखील यथावकाश प्रकाशित होतील. या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीच्या मुद्रणासाठी नागपूरचे सुप्रसिद्ध दानशूर श्री. संभाप्पा सागोळे यांनी उदार हस्ताने देणगी दिली होती. या दुसऱ्या आवृत्तीसाठी देखील त्यांनीच आर्थिक साहाय्य केले आहे. गुरूपौर्णिमेच्या निमित्ताने त्यांच्याकडून ही गुरूसेवाच घडली आहे यात संशय नाही. त्यांचे मन:पूर्वक आभार !

ग्रंथमुद्रणासाठी सर्वश्री. बाबूराव मैंदर्गीकर, अप्पासाहेब मैंदर्गीकर, अनिलकुमार इंगळे यांनी परिश्रम घेतले. त्यांचे आभार ! ज्यांच्यामुळे ग्रंथाची पहिली आवृत्ती अल्पावधीतच संपली त्या वाचकांचेही मन:पूर्वक आभार !

**- शे. दे. पसारकर**

**सोलापूर**
**दि. ३ जुलै १९९३**



काशी ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरु
**डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

# श्री.संभाप्पा सोमेश्वर सागोळे

## - अल्प परिचय -



श्री.संभाप्पा सागोळे यांचा जन्म ११-९-१९४२ ला अमरावती येथे झाला. १९६४ ते १९७२ या काळात त्यांनी भारतीय सैन्यात सेवा केली. त्यावेळी त्यांना रक्षासंग्राम, २५ स्वातंत्र्य जयंती व ५ पश्चिमी स्टार अशी पदके मिळाली.

वडील बंधू अप्पाराव सागोळे यांच्या मृत्युनंतर घराची सर्व जबाबदारी श्री.सांभप्पा यांच्यावर पडली. त्यांनी मोठ्या धीराने प्राप्त परिस्थितीला तोंड देऊन घराचा आर्थिक डोलारा सांभाळला. भावाच्या मुलामुलींच्या शिक्षणाची काळजी घेतली. त्यांचे विवाह थाटात लावून दिले.

त्यांना समाजकारणात आणि राजकारणातही रस आहे. शेती व व्यवसाय सांभाळून त्यांचे समाजकार्य चालू असते. स्वत:च्या समाजातील व इतरही समाजातील गोरगरिबांना, होतकरूंना ते जमेल तशी मदत करीत असतात. ते स्वत: आचरणशील वीरशैव आहेत.

त्यांनी अर्थार्जन केले आणि धर्मकार्यासाठी त्याचा विनियोगही केला. अनेक सामाजिक संस्थांना आणि व्यक्तींना त्यांनी उदारपणे मदत केली आहे. माजी उपराष्ट्रपती मा.श्री.बी.डी. जत्ती यांच्या सूचनेप्रमाणे ते अ.भा.बसव समितीचे आश्रयदाते सभासद झाले. विदर्भ प्रादेशिक बसव समिती, नागपूर, महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे तसेच अमरावती व वर्धा येथील समाजसंस्था अशा अनेक संस्थांना त्यांनी शिक्षणनिधी व अन्य रूपाने आर्थिक साहाय्य केले असून मन्मथस्वामी संस्थान कपिलधार येथे १९९० मध्ये यात्रिकांसाठी एक निवासस्थान बांधून दिले. नागपूरच्या बसवेश्वर पुतळ्यावर स्वखर्चाने छत्र बांधले. वीरशैव

वधुवर-पालक-मेळावा व अन्य अशाच कार्यास भरघोस आर्थिक मदत केली.

श्री.सागोळे यांनी हिंगणा येथील संत गाडगे महाराज महाविद्यालयाला ५१,००० रुपयांची देणगी दिली. वर्धा येथील वीरशैव मंगल कार्यालयासाठी ११,१११ रुपयांचे साहाय्य केले. अमरावतीच्या बुधवार मठात सभामंडप बांधून दिला. अशी अनेकविध कार्ये त्यांनी कुशलतेने करून आपल्या उदार प्रकृतीचे दर्शन घडविले.

सामाजिक, शैक्षणिक व धार्मिक कार्यांमुळे त्यांनी आपले समाजातील स्थान बळकट केले. १९८५ साली विदर्भ प्रादेशिक बसव समितीने त्यांचा 'बसवतत्त्वश्री' ही पदवी देऊन गौरव केला. ते वीरशैव सेवा समाज, नागपूर व लासीन मठ, अमरावती या संस्थांचे विश्वस्त असून नागपूर जिल्हा वीरशैव सभेचे अध्यक्ष आहेत. १९८५ मध्ये 'अ.भा.बसवतत्त्व संमेलन, नागपूर'चे स्वागताध्यक्षपद त्यांनी भूषविले. रेणुक इन्फ्लायजेन्स ॲन्ड फॉर्मास्युटिकल्स प्रा.लि. चे ते चेअरमन असून १९८२ मध्ये त्यांनी श्री रंभापुरी जगद्गुरूंचे श्रावणमास अनुष्ठान व ज.पंचाचार्य पालखी महोत्सवाचे आयोजन केले होते. त्यांच्या सुविद्य पत्नी सौ.सुनंदा त्यांना त्यांच्या कार्यात सदैव सहकार्य करीत असतात. तीन मुले व एक मुलगी असा त्यांचा परिवार आहे.

जिद्द, निष्ठा, आत्मविश्वास, प्रामाणिकता आणि गुरुसेवा या सद्गुणांनी त्यांचे व्यक्तिमत्त्व अलंकृत झाले आहे. 'जन्म हा अखेरचा' या पुस्तकासाठी त्यांनी कर्तव्यबुद्धीने व उदारपणे मदत केली. त्यामुळे या पुस्तकाचे प्रकाशनकार्य अधिक सुकर झाले. त्यांच्या कडून अशीच समाजसेवा सदैव घडत राहावी आणि त्यामुळे त्यांचे जीवन अधिकाधिक उजळून निघावे ही अपेक्षा.

– एक सुहृद

# अनुक्रम

# शिवस्तुतिः

त्रैलोक्यसंपदालेख्यसमुल्लेखनभित्तये ।
सच्चिदानन्दरूपाय शिवाय ब्रह्मणे नमः ॥
ब्रह्मेति व्यपदेशस्य विषयं यं प्रचक्षते ।
वेदान्तिनो जगन्मूलं तन्नमामि परं शिवम् ॥
यस्योर्मिबुद्बुदाभासः षट्त्रिंशत्तत्त्वसंचयः ।
निर्मलं शिवनामानं तं वन्दे चिन्महोदधिम् ॥
यद्भासा भासते विश्वं यत्सुखेनानुमोदते ।
नमस्तस्मै गुणातीतविभवाय परात्मने ॥
सदाशिवमुखाशेषतत्त्वोन्मेषविधायिने ।
निष्कलंकस्वभावाय नमः शान्ताय शंभवे ॥
स्वेच्छाविग्रहयुक्ताय स्वेच्छावर्तनवर्तिने ।
स्वेच्छाकृतत्रिलोकाय नमः सांबाय शंभवे ॥
यत्र विश्राम्यतीशत्वं स्वाभाविकमनुत्तमम् ।
नमस्तस्मै महेशाय महादेवाय शूलिने ॥

# शक्तिस्तुतिः

यामाहुः सर्वलोकानां प्रकृतिं शास्त्रपारगाः।
तां धर्मचारिणीं शंभोः प्रणमामि परां शिवाम् ॥
यया महेश्वरः शंभुर्नामरूपादिसंयुतः।
तस्यै मायास्वरूपायै नमः परमशक्तये ॥
शिवाद्यादिसमुत्पन्नशान्त्यतीतपरोत्तराम् ।
मातरं तां समस्तानां वन्दे शिवकरीं शिवाम् ॥
इच्छाज्ञानादिरूपेण या शंभोर्विश्वभाविनी ।
वन्दे तां परमानंदप्रबोधलहरीं शिवाम् ॥
अमृतार्थं प्रपन्नानां या सुविद्याप्रदायिनी ।
अहर्निशमहं वन्दे तामीशानमनोरमाम् ॥

# सद्बुद्धीची ज्योत

**काशीज्ञानपीठाचे आदिजगद्गुरू विश्वाराध्यापासून विश्वेश्वर शिवाचार्यांपर्यंतच्या गुरुपरंपरेला वंदन करून–**

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आज आपण पाहतो की मानवी जीवन अत्यंत गतिमान झाले आहे. थोडा वेळ शांत बसून कोणाशी जिव्हाळयाच्या दोन गोष्टी बोलायला अथवा आपल्या आयुष्याकडे वळून पाहून काय कमावले आणि काय गमावले अशी बेरीज-वजाबाकी करायला आपल्याजवळ वेळ नसतो. ज्याची आवड असते ते करण्याइतकीही सवड आपल्याकडे नसते. सारखी धावपळ. घडयाळाच्या काटयावर आयुष्य टांगलेले. यात आपला दोष नाही. एकूण जगच गतिमान झाले आहे. डिझेल-पेट्रोल जाळत धावणाऱ्या मोटारी, धडधडत जाणाऱ्या आगगाड्या, आकाशात झेपावणारी विमाने आणि अंतराळाचा वेध घेणारी आकाशयाने. ही आजच्या गतीची आणि प्रगतीची चित्रे आहेत. जुन्या काळात आकाशात संथ फिरणारी घार पाहून माणूस समाधान मानायचा आणि पौर्णिमेचा चंद्र पाहून खूष व्हायचा. आज आपली नजर पृथ्वीपलीकडे जाणाऱ्या आकाशयानांकडे आहे आणि असंख्य तारकांनी खचलेली आकाशगंगा आपल्या दृष्टिसमोर तरळत आहे.

विज्ञान प्रगत झाले खरे परंतु त्याने माणसाला विनाशाच्या काठावर आणून ठेवले. पन्नास वर्षांपूर्वी फक्त हिरोशिमाचीच राख झाली. आता राख झाली तर साऱ्या पृथ्वीची होईल. कोठून कोठपर्यंत आलो आपण? वैज्ञानिक प्रगती ही बुद्धीचीच निर्मिती. काही अंशी ती सद्भावनेने झाली. परंतु अणुबॉंबची निर्मिती मात्र सद्बुद्धीने निश्चित झाली नाही. सद्बुद्धीचे बळ कमी पडले आणि दुर्बुद्धीचे फावले तर पृथ्वीची राखरांगोळी व्हायला कितीसा वेळ लागणार? सारी वैज्ञानिक प्रगती शून्यवत् ठरविण्याचे सामर्थ्य अणुबॉंबमध्ये दडलेले आहे.

ही शस्त्रे का निर्माण झाली? माणसाला धडा शिकवायला, त्याला सुधारायला. राज्यकर्त्यांना वाटते की माणूस शस्त्राच्या धाकाने सुधारेल आणि आचार्यांना वाटते की माणूस शास्त्राने सुधारेल. शस्त्र आणि शास्त्र हे दोन्ही माणसाला सुधारण्याचे उपाय आहेत. शस्त्र हे केवळ स्थूल

शरीरापर्यंत पोचू शकते. सूक्ष्म शरीराचे काय? एखाद्याला फाशी दिली की प्रश्न संपत नाही, उलट तीव्र बनतो. जोपर्यंत दुर्विचार संपत नाही तोपर्यंत शिक्षेला काही अर्थ नाही.

शास्त्राचा मात्र सूक्ष्म शरीरावर, मनावर परिणाम होतो. शास्त्रामुळे दुर्वर्तनी मनुष्य सुधारतो आणि इतरांचा मार्गदर्शक होतो. वाल्हयाचा वाल्मीकी शास्त्रामुळे झाला, शस्त्रामुळे नव्हे. शस्त्र हा अंतिम उपाय नाही. एवढी युध्दे आणि महायुध्दे होऊन माणूस कोठे सुधारला? माणसात किती परिवर्तन झाले?

शत्रुत्व संपत नाही, असे शास्त्र सांगते. मेल्यावर देखील शत्रू एकमेकांच्या जवळ, कधी एकाच घरी जन्म घेतात. सख्खे भाऊ हे पक्के वैरी उगाच का होतात? म्हणून शत्रू मारून उपयोग नाही, शत्रुभाव मारला पाहिजे.

एक महात्मा जहाजात प्रवास करीत होता. दुष्ट वृत्तीचे काही सहप्रवासी त्याची टवाळी करू लागले. महात्मा सारे काही शांतपणे सहन करीत होता. परंतु त्याची निंदा देवालाच सहन झाली नाही. देवाने महात्म्याला म्हटले

' हे तुझी चेष्टा करताहेत ते मला सहन होत नाही. त्यांना धडा शिकवायला, तू सांगशील तर मी हे जहाजच उलटून टाकतो!'

' उलटूनच टाकायचे असेल तर जहाज कशाला?' महात्मा म्हणाला, ' त्यांची बुध्दी उलटून टाक.'

बुद्धी सुधारली की माणूस सुधारतो. आणि बुद्धी सुधारण्यासाठी शास्त्राइतके दुसरे चांगले साधन नाही. बुद्धी कर्माने बांधलेली आहे. कर्म सुधारले की बुद्धी सुधारते आणि बुद्धी सुधारली की कर्म सुधारते. सात्त्विक व्यक्तीच्या सहवासाचाही चांगला परिणाम होतो. क्रूर माणसाची भावना सात्त्विक माणसाच्या संगतीने क्षीण होते. म्हणून सद्बुद्धीचे मोल आयुष्यात मोठे आहे. ज्योत लहान दिसली तरी तिच्याठायी घर उजळून टाकण्याचे सामर्थ्य असते, तसे सद्बुद्धी लहान वाटली तरी तिच्यामुळे आयुष्य उजळून निघते. ज्याला जीवनाचे सार्थक करून घ्यायचे आहे त्याने सद्बुद्धीची ज्योत सदोदित तेजाळत राहील अशी काळजी घेतली पाहिजे.

माणसाच्या ठायी वसणाऱ्या सद्बुद्धीला आवाहन करण्यासाठी, ती जागृत करण्यासाठी शास्त्रांची निर्मिती झाली. जीवाचे उन्नयन करून त्याला

शिवरूप करण्याच्या उद्देशाने भगवद्पाद जगद्गुरू रेणुकाचार्यांनी अगस्ती महर्षींना निमित्त करून शिवशास्त्राचा उपदेश केला. त्याचा संग्रह शिवयोगी शिवाचार्यांनी 'सिद्धान्तशिखामणी' या ग्रंथात केला आहे. यात कोणत्याही सिद्धान्ताचे खंडन नाही तर सर्व सिद्धान्तांचा समन्वय आहे. म्हणून हा 'सिद्धान्तशिखामणी' होय. हा ग्रंथ समन्वयवादी असून सर्वमान्य आहे. वीरशैवांच्या 'षट्स्थल' सिद्धान्तातील पिंडस्थलापासून ते ज्ञानशून्यस्थलापर्यंत एकशे एक स्थलांचे विस्तृत वर्णन यात आहे. हा भक्ताचा आध्यात्मिक प्रवास आहे. एकशे एक स्थले या पायऱ्या आहेत. संख्या अधिक आहे म्हणून साधकाने घाबरून जाण्याचे कारण नाही. धीरवृत्तीने हळूहळू या पायऱ्या चढता येतात.

एक मनुष्य मंदिरात जाऊन देवदर्शन करावे या इच्छेने रात्री घरातून बाहेर पडला. सोबत कंदील घेतला. बाहेर येऊन पाहतो तो सभोवती घनदाट अंधार दाटलेला. मंदिर काही अंतरावर समोरच होते. आतला नंदादीपही दिसत होता. परंतु मध्ये भयानक अंधार पसरलेला. तो घाबरून परत वळला. बायकोने विचारले, 'का परत फिरलात? जायचे नाही?'

'बाहेर किती अंधार पडलाय बघ. कंदिलाचा प्रकाश फक्त माझ्या पावलापुरताच आहे. पुढे पडत नाही' त्याने उत्तर दिले.

'अहो कंदिलाचा प्रकाश तेवढाच असणार, तुमच्या पावलांपुरता', ती हसून म्हणाली, 'पण हाच प्रकाश तुमच्या पावलांना शेवटपर्यंत सोबत करील आणि सारी वाट अशी उजळून जाईल. त्यात घाबरायचे कशाला?'

साधकाची धीरवृत्ती कंदिलासारखी त्याच्या सोबतीला असली तर ही एकशे एक स्थले पार करणे काहीच अवघड नाही. म्हणून साधकाने एकशे एक हा आकडा ऐकून घाबरून जाऊ नये.

'सिद्धान्तशिखामणी'तील काही तत्त्वांचा परिचय आम्ही या श्रावणमासात आमच्या आशीर्वचनांतून करून देणार आहोत. हा विषय मुळात मोठा आहे, गहन आहे. परंतु सामान्यांना त्याचे थोडे ज्ञान असावे या उद्देशाने आम्ही साररूपाने त्याचे विवेचन करणार आहोत. यानिमित्ताने हा सिद्धान्त समजून घेऊन त्याचे आचरण करावे आणि कृतार्थता अनुभवावी, हे आशीर्वचन!

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# जन्म हा अखेरचा

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भक्ती ही मुक्तीचे मूळ आहे. जन्मजन्मान्तराचा प्रवास करून शिणलेल्या जीवाला मुक्तीचा ध्यास लागतो. ईश्वराचे विस्मरण ही विपत्ती आणि ईश्वराचे स्मरण ही संपत्ती हे त्याला उमगते. गुरुकृपेने त्याच्यावर शिवाचा अनुग्रह होतो. त्याचे अंत:करण शुद्ध होते आणि अशा शुद्ध अंत:करणात उत्कट भक्ती जागी होते. ज्याच्या मनात अशी भक्ती रुजते त्याचा हा अखेरचा जन्म. या जन्मात त्याच्यासाठी त्याच्यापुरते जन्ममृत्यूचे रहाटगाडगे थांबणार आहे, कल्प-महाकल्पाची गणिते चुकणार आहेत आणि त्याच्या सगळ्या कर्मांची बेरीज-वजाबाकी शून्य होऊन तो शिवरूपात विलीन होणार आहे. म्हणून हा अखेरचा जन्म !

अनेक जन्मात केलेल्या पुण्यसंचयामुळे ज्याचे पाप क्षीण होऊन अंत:करण परिशुद्ध झाले अशा जीवाला 'सिद्धान्तशिखामणी'त 'पिंड' म्हटले आहे. हा पिंड नामक जीव इतर सामान्य जीवांपेक्षा विलक्षण असतो. आपल्या चारित्र्याने आणि वर्तनाने तो सामान्य जीवांत वेगळा उठून दिसतो.त्याचे हे शरीर अंतिम, अखेरचे असते. कारण त्याला यानंतर पुन्हा गर्भवास नाही, पुन्हा येणे नाही :

जन्तुरन्त्य शरीरोऽसौ पिण्डशब्दाभिधेयक: ॥५-५४॥

दृश्य विश्व हे शिव-शक्तीचा विलास आहे. त्याच्या ठायी अविनाभावसंबंधाने असणाऱ्या शक्तीमुळेच परशिव भोक्ता, भोज्य आणि प्रेरयिता असा त्रिविध होतो. भोक्ता म्हणजे आपली कर्मफळे भोगणारा जीव. भोज्य म्हणजे प्रपंच आणि प्रेरयिता म्हणजे जीवाला प्रेरणा देणारा ईश्वर. एकाच परशिवाची ही तीन रूपे आहेत. तो शुद्ध सत्त्व-उपाधीमुळेईश्वर रज-तममिश्रित सत्त्व-उपाधीमुळे भोक्ता आणि तम-उपाधीमुळे भोज्य झाला आहे. जीव हा परशिवाचाच अंश आहे :

तदंशो जीवनामक: ॥५-३४॥

जीव म्हणूनच अल्पज्ञ, अल्पकर्ता आहे. शिवज्ञानाच्या अभावाने आपल्या कर्मानुसार तो संसारचक्रात भ्रमत असतो. आपल्या कर्मपाशांनी बांधलेला असल्यामुळे त्याला 'पशू' असे म्हणतात. जीव पशू कसा? तर बाजारात जाणारे गाय, बैल हे पशू कितीही हाकलले तरी पुन:पुन्हा खायला मिळते म्हणून तेथेच येतात. तसे दुष्कर्मांची फळे भोगूनदेखील जीव पुन्हा दुष्कर्माकडेच वळतो. हे पशुत्वाचे लक्षण त्याच्याठायी असल्यामुळे तो पशू आहे.

आपण ज्याला जड मानतो अशा प्रपंचात देखील गूढरूपाने चैतन्य दडलेले आहे. आपल्या स्थूल दृष्टीला ते दिसत नाही इतकेच. ज्याची संवेदना तरल झालेली असते त्याच्याशी निसर्ग हितगुज करतो. अशी संवेदनशील माणसे पक्ष्यांची गाणी ऐकतात, झऱ्याचे संगीत अनुभवतात, झाडांची पाने वाचतात आणि मातीचा उपदेशदेखील समजून घेतात. कुंभाराच्या पायाखाली तुडवली जाणारी माती कबिराशी बोलते :

माटी कहे कुम्हारसु तू क्यां रौंदे मोहे।
इकदिन ऐसा आवेगा मैं रौंदुंगी तोहे॥

विश्व हे क्षणोक्षणी आपल्याला उपदेश देत असते.जगदेखील एक गुरूच आहे.आपल्याला त्याचा उपदेश कळत नाही ही अडचण आहे. जडाची भाषा समजायला देखील एक योग्यता असावी लागते. दत्तात्रेयांनी चोवीस गुरू केले असे आपण ऐकतो,त्याचा अर्थ हाच आहे.एवढेच नव्हे तर आपले शरीरही आपला गुरू आहे.जीर्ण झालेले अवयव आपल्याला वैराग्याच्या उपदेश देत असतात. राजा दशरथ आरशात पाहून मुकुट घालत असताना त्याला कानावर दोन पांढरे केस आलेले दिसले. त्याला वाटले हे माझ्या कानात असा उपदेश करतात की, राजा तुझे हे मस्तक मुकुट धारण करायला योग्य नाही. तेव्हा तू हा मुकुट राजपुत्राच्या डोक्यावर ठेव आणि वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार कर. दशरथाने लगेच राज्याभिषेकाची तयारी केली.आजच्या काळात दोनच काय पण डोक्यावरचे सारे केस

पांढरे होऊन उपदेश करू लागले तरी त्यांच्या तोंडावर काळी पट्टी (कलप) बांधून त्यांचे तोंड बंद करतील. मग उपदेश ऐकणे तर दूरच! असे सारे विश्वच ज्ञानाने परिपूर्ण आहे. ते शोधायची दृष्टी नसल्यामुळे आपल्या वाट्याला कायमचे आंधळेपण आले आहे.

जीव हा शिवाचा अंश आहे. ठिणगी हा अग्नीचा अंश आहे तसा. परंतु ठिणगीमुळे आपल्याला प्रकाश मिळत नाही किंवा तिच्यावर अन्नही शिजवू शकत नाही.ठिणगीच्या प्रकाशात इतर वस्तू दिसत नसल्या तरी स्वत:चे अस्तित्व दाखवण्याइतकी ती प्रकाशमान निश्चित असते. तसा जीवात्मा शिवाचा अंश असूनही त्याला आपल्या अस्तित्वाची केवळ जाणीव असते. तो अल्पज्ञ आणि अल्पकर्ताच असतो.

वीरशैव तत्त्वज्ञान संकोच-विकासवादी आहे. शक्तीचा संकोच झाला की जीव होतो. तिचा विकास झाला की जीवाचा शिव होतो.विजेच्या बल्बचा प्रकाश खोलीभर पसरलेला असतो, परंतु त्यावर एखादे भांडे झाकले तर तो फक्त भांड्यापुरताच मर्यादित होतो. तसा शिव हा सर्वव्यापक आहे, परंतु देहात तो संकुचित होतो. जीव आणव,मायिय आणि कार्मिक अशा तीन मलांनी आवृत्त असतो. 'मी अणु आहे, मी जीव आहे' हा अणुभाव जीवाच्या ठिकाणी आणवमलाने येतो. मायिय मलामुळे जीव शुभाशुभ कर्मे करायला प्रवृत्त होतो. ही कर्मेच कार्मिक मल होय. असा जीव आपल्या कर्माप्रमाणे जन्मफेऱ्यात सापडून सारखा परिभ्रमत असतो. प्रत्येक बीजात जसा अंकुर असतो तसा प्रत्येक जीवाच्या हृदयात शिवाचा निवास असतो :

बीजे यथांऽकुर: सिद्धस्तथात्मनि शिव: स्थित: ॥५-३६॥

हृदयातला शिव त्याला धर्ममार्गाचा आणि मोक्षमार्गाचा उपदेश करीत असतो.त्याला वाईट कर्मांपासून परावृत्त करीत असतो. तरी देखील शिववाणीकडे दुर्लक्ष करून तो दुष्कर्मे करतो आणि कोळी स्वत:च्या जाळ्यात अधिकाधिक गुंतत जावा तसा आपल्याला कर्म-जाळ्यात गुरफटून घेतो. जो स्वत:चा आतील आवाज ऐकत नाही तो जगात कुणाचेच ऐकत नाही.

परंतु असंख्य जीवांपैकी एखादा मात्र हृदयातील ईश्वराची वाणी श्रवण करतो, सन्मार्गात लागून सत्कर्मे करतो. त्याच्या वासना क्षीण

होऊन अंत:करण शुद्ध होते, आणि शिवाचा अनुग्रह होऊन त्याच्या ठायी उत्कट भक्ती उत्पन्न होते. अशा जीवाचा जन्म अखेरचा असतो, असे समजावे. इतर पामर जीव जन्म-मरणाच्या जात्यात भरडतच राहतात.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# आत्मा आणि अनात्मा

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अध्यात्ममार्गाचा प्रवास करू इच्छिणाऱ्या माणसाच्या ठिकाणी चार प्रकारची साधनसंपत्ती असावी लागते. विवेक, वैराग्य, शमदम इ. षट्संपत्ती आणि मुमुक्षुता. विवेक हा दोन प्रकारचा आहे. नित्यानित्यवस्तुविवेक आणि आत्मानात्मविवेक. परमात्मा हा नित्य असून त्याशिवाय इतर सर्व वस्तू अनित्य आहेत हे ज्ञान म्हणजे नित्यानित्यवस्तुविवेक. आत्मा हा सत्-चित्-आनंदस्वरूप असून त्याच्याशिवाय अन्य शरीरादी सर्व जड, अनात्म आहेत हे ज्ञान म्हणजे आत्मानात्मविवेक. आत्मानात्मविवेक हा परमार्थाचा सोपान होय.

परमात्म्याचा शोध आपण ब्रह्मांडात व पिंडात घेऊ शकतो. ब्रह्मांडात म्हणजे विश्वात दडलेल्या चैतन्याला आपण 'परमात्मा' म्हणतो आणि पिंडात म्हणजे शरीरात वास करणाऱ्या चैतन्याला 'आत्मा' असे संबोधतो. आत्मा आणि परमात्मा या दोन वस्तू नसून एकच आहे. परमात्म्याचा शोध ब्रह्मांडात करण्यापेक्षा पिंडात करणे सोपे आहे. म्हणूनच ज. रेणुकाचार्यांनी अगस्ती महर्षींना उपदेश करताना 'सिद्धान्त शिखामणी'च्या पिंडज्ञानस्थलात अतिशय सुबोध रीतीने आत्मानात्मविवेकाचे विवेचन केले आहे. ज्यांना स्वतःच्या हृदयात देव दिसतो त्यांनाच जगात ईश्वराचा साक्षात्कार होतो. ज्यांच्या मलिन हृदयात देव प्रकटत नाही त्यांना जगात देव कसा दिसेल? म्हणून परमात्म्याचा शोध घेण्याआधी आत्म्याचा शोध घ्यायला हवा.

चार्वाकाने स्थूल शरीरालाच आत्मा मानले असून ऐहिक सुखोपभोगांचा पुरस्कार केला आहे.

यावज्जीवेद् सुखं जीवेद् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्।<br>
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः॥

चार्वाकाचे सांगणे गोड आहे, लोकांना आवडणारे आहे. जोपर्यंत

जीवन आहे तोपर्यंत सुखाने जगा. कर्ज काढून तूप प्या, मौज करा. एकदा देहाची राख झाल्यावर कसला आला आहे पुनर्जन्म? मग कोण येणार आहे तुमचे कर्ज मागायला? चार्वाकाचे हे तत्त्वज्ञान कोणाला आवडणार नाही? म्हणून प्रत्येक मनुष्य सुरुवातीला चार्वाकच असतो. चार्वाक म्हणतो : आत्मा नावाची स्वतंत्र वस्तू नाही. पान, चुना, काथ, सुपारी यांच्या मिश्रणातून लाल रंग निर्माण होतो त्याप्रमाणे पृथ्वी, आप, तेज व वायू या चार महाभुतांच्या संयोगातून चैतन्य (म्हणजे आत्मा) निर्माण होते. हे चैतन्य म्हणजे भौतिकशक्ती असून ते आत्मा, मन, सुखदुःख इत्यादी स्वरूपांत प्रकट होते. जे एकत्र येते त्याचे केव्हातरी विघटन होणारच. चार महाभुतांचे विघटन होऊन मृत्यू होतो. तोच मोक्ष असून त्याच्या प्राप्तीसाठी कोणती व्रते, वैकल्ये करण्याची गरज नाही. प्रत्येक मनुष्याची शरीर हाच आत्मा अशी दृढ भावना असते आणि सोळा संस्कार देखील देहावर केले जातात म्हणून शरीर हाच आत्मा होय, असे चार्वाक मानतो.

शरीर हा इंद्रियांचा समूह असून इंद्रिये वेगळी केली तर शरीराला अस्तित्व राहत नाही. म्हणून शरीर हा आत्मा नसून इंद्रिये हाच आत्मा होय, असे काही दार्शनिकांचे मत आहे. काही लोक ज्ञानेंद्रियांनाच आत्मा मानतात. पाच ज्ञानेन्द्रिये, पाचकर्मेन्द्रिये आणि मन अशी अकरा इंद्रिये असून मन हे सर्व इंद्रियांचा स्वामी आहे. मनाशिवाय कोणत्याही इंद्रियाकडून व्यवहार घडत नाहीत,म्हणून काही दार्शनिक मन हाच आत्मा असे मानतात. तर मनाला आत्मा न मानता इंद्रिये व मन यांना स्फूर्ती देणाऱ्या प्राणशक्तीला आत्मा मानणारे दार्शनिक आहेत. प्राणांचे महत्त्व सांगणारी एक कथा छांदोग्योपनिषदात आली आहे.

एकदा सर्व इंद्रिये 'मी श्रेष्ठ' म्हणत एकमेकांशी भांडू लागली. भांडण प्रजापतीपर्यंत गेल्यावर त्याने निर्णय दिला की, जो देह सोडून गेल्यावर देह अचेतन होऊन व्यवहार थांबेल तो श्रेष्ठ. या निर्णयाप्रमाणे वागेंन्द्रियाने शरीर सोडले व वर्षभराने परत आल्यावर त्याला दिसले की शरीराचे कार्य आपल्यामागे थांबले नाही. सर्वांत शेवटी प्राणाने शरीर सोडून जाण्याची तयारी करताच सर्व इंद्रिये कासावीस झाली, शरीरव्यापार थंडावू लागला. त्यावेळी सर्व इंद्रियांनी प्राणाला शरीर न सोडण्याची विनवणी केली. अशाप्रकारे प्राणाचे श्रेष्ठत्व सिद्ध झाले म्हणून काही दार्शनिक इंद्रिये आत्मा नसून त्यांना प्रेरित करणारा प्राण हाच आत्मा होय असे मानतात.

परंतु प्राण क्रियारूप असून जड आहे. तो ज्ञानरूप नाही. योगीपुरुष प्राणायाम करून प्राणाला स्वतःच्या नियंत्रणात ठेवतात.आत्मा स्वतंत्र आहे म्हणून प्राण हा आत्मा नसून बुद्धी हा आत्मा आहे. निर्णय करणे आणि अभिमान बाळगणे हे बुद्धीचे कार्य असून जागृत व स्वप्नावस्थेत हे कार्य चालू असते. गाढ झोपेत मात्र बुद्धीचा लय होऊन तिचे कार्य थांबते. म्हणून बुद्धी हा आत्मा असू शकत नाही. गाढ झोपेतून उठलेला मनुष्य 'मी सुखाने झोपलो होतो,'असे म्हणतो, तेव्हा त्याने सुखरूपाचा अनुभव घेतलेला असतो. हे चिद्रूप व आनंदरूप अहंतत्त्व म्हणजे आत्मा होय.

'मी' आणि 'माझे' या मनाच्या वृत्ती आहेत. 'माझे' शब्दाने निर्दिष्ट होणारे सर्व अनात्मा आहे. उदा- माझे घर, माझे शरीर इत्यादी. परंतु 'मी' शब्दाने मात्र आत्म्याचा निर्देश होतो. अहंप्रत्ययाचा विषय फक्त आत्माच असतो. म्हणून ज. रेणुकाचार्य म्हणतात :

नेन्द्रियाणां न देहस्य न बुद्धेरात्मता भवेत् ।
अहं प्रत्ययवेद्यत्वादनुभूत स्मृतेरपि ॥५-५७॥

शरीर, इंद्रिये, मन, प्राण, बुद्धी हे 'माझे' या वृत्तीचे विषय असल्यामुळे आत्मा होऊ शकत नाहीत. मी अशा अहंप्रत्ययाने अनुभवाला येणारे जे सनातन तत्त्व तेच आत्मा होय.

अशाप्रकारे आत्मा आणि अनात्मा यांचा निवाडा करून आत्मतत्त्वाचे जो ज्ञान प्राप्त करून घेतो अशा साधकाला 'सिद्धान्तशिखामणी'त पिंडज्ञानी म्हटले आहे.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# ‘मी’ आणि ‘माझे’

जिज्ञासू सद्भक्तांनो ,

सृष्टी आणि संसार या भिन्न गोष्टी आहेत. सृष्टी ही शिवनिर्मित आहे तर संसार हा जीवनिर्मित आहे. शिवनिर्मित सृष्टीतील पदार्थांवर ममत्वाचा शिक्का मारून प्रत्येक जीव आपला स्वत:चा संसार निर्माण करीत असतो. ईश्वराने स्त्री आणि पुरूष निर्माण केले तर माणसाने त्यात ममत्व ओतून पती-पत्नीचे नाते निर्मिले. स्त्री-पुरूष ही सृष्टी तर पती-पत्नी हा संसार. लहान मुले भातुकली खेळताना घर बांधतात, कुणी घराला धक्का लावला की रडतात. मनुष्याची अशीच अवस्था आहे. त्याचे ममत्व लहान मुलासारखे. जोपर्यंत ज्ञान प्राप्त होत नाही तोपर्यंत वय वाढले तरी मनुष्य लहानच असतो आणि स्वत:च निर्मिलेल्या संसाराला जन्मभर कवटाळून बसतो.म्हणून ‘मी’ आणि ‘माझे’ म्हणजे मी-पणा आणि ममत्व हाच ‘संसार’ आहे.

संसार हा दु:खदायक आहे अशी संतांची साक्ष आहे. वीरशैव संतकवी मन्मथस्वामी म्हणतात :

संसाराचे ठायी असते जरी सुख।
सांडोनिया देख जाते केवि॥

संसार सुखदायक असता तर संतमहात्म्यांनी तो का सोडला असता? ‘संसार सोडा’ असा उपदेश कशाला केला असता? म्हणून संसार दु:खदायक आहे हे निश्चित. परंतु शिवनिर्मित सृष्टी हा संसार मानला तर ती दु:खदायक कशी? म्हणून सृष्टी आणि संसार भिन्न आहेत. शिवनिर्मित सृष्टी ही शिव आहे, पवित्र आहे परंतु जीवनिर्मित संसार मात्र अशिव आहे, अपवित्र आहे. तो बंधनकारक आणि दुस्तर आहे. संसार हा सागर आहे, संसार हे अरण्य आहे, संसार हा दावानल आहे हे दृष्टान्त संसार सोडणे किती कठीण आहे हेच सांगतात. तर संसार हा वादळातील

दिवा आहे, संसार हा पाण्यावरचा बुडबुडा आहे या कल्पना संसाराची क्षणभंगुरता स्पष्ट करतात. संसार हा शत्रू आहे असे शिवशरणांनी म्हटले आहे :

संसारव्यंब हगेयय्या तंदे।

संसार बंधनकारक आहे. माणूस संसार कसा सोडणार? संसारच माणसाला सोडत नाही. एखाद्या वस्तूला 'माझी' म्हटले की ती आपल्याला बांधून टाकते आणि 'माझी नाही' म्हटले तर मुक्त करते: 'ममेति बध्यते जंतुः न ममेति विमुचते.' संसाराचा पाश अन्य बंधनाप्रमाणे दृश्य नसून अदृश्य आहे.

एकदा गुरु-शिष्य फिरायला निघाले. त्यांच्या समोरून एक शेतकरी गायीला दोरीने बांधून ओढत नेत होता. गुरूंनी शिष्याला सहज विचारले, 'सांग बरे कोणी कोणाला बांधले ? शेतकऱ्याने गायीला की गायीने शेतकऱ्याला?'

'उघड आहे'; शिष्य उत्तरला, 'शेतकऱ्याने गायीला बांधले. दोरी गायीच्या गळ्यात आहे अन् शेतकरी तिला ओढत नेतोय !'

गुरूंच्या मुखावर गूढ हास्य विलसले. त्यांनी शेतकऱ्याला थांबवून त्याच्या हातातून दोरी काढून घेतली आणि गायीला सहज थोपटले. ती एकदम उधळली आणि धावत सुटली. शेतकरी तिच्या मागून जिवाच्या आकांताने धावत सुटला.

'आता सांग कोणी कोणाला बांधले ?' गुरूंनी शिष्याला विचारले. शिष्य मनोमन उमजला.

संसारबंधन असे अदृश्य आहे. ते दिसत नाही, पण असते. संसार दुःखदायक देखील आहे. शिवसृष्टीत काहीही घडले तरी जीवाला सुख-दुःख होत नाही. मात्र जीवसृष्टीत म्हणजे संसारात जर काही अनुकूल घडले तर जीवाला सुख होते आणि प्रतिकूल घडले तर दुःख होते.

एका श्रीमंत माणसाची गावात चारपाच घरे होती. त्याला मुलेबाळे असून ती व्यवहारकुशल होती. एकदा त्याच्या एका घराला आग लागली. श्रीमंत माणसाला कळताच तो धावत गेला. आणि आपले घर पेटलेले पाहताच मोठ्याने रडू लागला. तेवढ्यात त्याचा एक मुलगा जवळ येऊन म्हणाला,

'बाबा, रडता कशाला? हे घर तर आम्ही कालच विकून टाकले!'

मुलाचे शब्द ऐकताच त्या श्रीमंत माणसाचे रडणे एकदम थांबले आणि तो हसू लागला!

घराविषयी ममत्व असल्यामुळे तो आधी रडला, आणि ते विकले हे कळल्यामुळे क्षणात ममत्वशून्य होऊन हसू लागला. असा हा संसार दुःख देणारा आहे.

अहंकार जीवाच्या ठिकाणी असतो तर ममत्व वस्तूच्या ठिकाणी असते. ममत्वाची ठिकाणे बदलतात. कधी पैशात ममत्व असेल तर कधी पैशाने विकत घेतलेल्या वस्तूत. ममत्व हटवणे सोपे असले तरी मिटवणे मात्र फारच कठीण. अहंकार हा दिव्याच्या ज्योतीसारखा एकाच ठिकाणी स्थिर राहतो तर ममत्व मात्र दिव्याच्या प्रकाशासारखे दूरवर फाकते. ममत्व रबरी तंबूसारखे कितीही ताणले जाऊ शकते. जेवढा वस्तूंचा संग्रह वाढतो तेवढे ममत्व वाढते. ममत्व वाढले तर अहंकार वाढतो आणि अहंकार वाढला की ममत्व वाढते. भिकाऱ्याजवळ वस्तू कमी असल्यामुळे त्याचा अहंकारही निर्जीव असतो. परंतु त्याच्या जवळचा वस्तुसंग्रह वाढला की ममत्व आणि त्यानंतर अहंकार वाढतो.

ममत्व हा प्रेमरज्जू आहे. पोलादी शृंखला बाहुबलाने तोडता येतात परंतु हा चिवट प्रेमरज्जू तोडणे महाकठीण. तो विवेक आणि वैराग्य यांच्या बळानेच तोडता येतो. सर्प जसा आपल्या शरीराचे वेटोळे घालून फणा वर करून बसतो तसा जीवदेखील आपल्या ममत्वाचे वेटोळे घालून अहंकाराचा फणा काढून बसतो. वस्तूचा त्याग करून ममत्व सुटणार नाही तर ममत्वभावाचा त्याग करूनच सुटेल. अहंकार आणि ममत्वाचे समष्टीत परिवर्तन करायला हवे. घराविषयीचे ममत्व 'हे विश्वचि माझे घर' म्हटल्याने क्षीण होईल, तर 'मीच चराचर' असे म्हटल्याने अहंकार क्षीण होईल.

अहंकारदेखील दोन प्रकारचा आहे. एक शुद्ध अहंकार. 'अहं ब्रह्मास्मि' 'शिवोऽहम्' असा आत्मस्वरूपाचा बोध हा शुद्ध अहम् तर बुद्धिवृत्तीतून निर्माण झालेला देहाहंकार हा अशुध्द अहंकार. हा अहंकारच बंधनकारक असून त्याचा नाश करावा असे तत्त्वज्ञ सांगतात.

वीरशैव-सिद्धान्तात सृष्टी सत्य मानली आहे. कारण सृष्टी हा शिव-शक्तीचा विलास असून ती शिवशक्तीस्वरूपच आहे.

तस्माद् शिवमयं सर्वं जगदेतच्चराचरम् ॥१०-६७॥

'सिद्धान्त शिखामणी'त संसारहेयस्थलाचे निरुपण आलेले आहे. संसार हा हेय आहे, तुच्छ आहे, किळसवाणा आहे. त्याचा त्याग केला पाहिजे असे प्रतिपादन केलेले आहे. शिवनिर्मित सृष्टी हा संसार मानला तर ती किळसवाणी ठरेल. ती तशी नाही. म्हणून मी आणि माझे या भावनेतून जीवाने निर्मिलेला संसार हाच हेय होय.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# जन्म-मरणाचा फेरा

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जन्म आणि मृत्यू हा देहाचा स्वाभाविक धर्म आहे. सूर्य उगवतो तो मावळण्यासाठी, फूल उमलते ते कोमेजण्यासाठी आणि जीव जन्मतो तो मरण्यासाठीच. असा हा उत्पत्ति-विलयाच्या वाटेवरचा प्रवास आहे. तो प्राकृतिक आहे, स्वाभाविक आहे. जन्मलेल्या प्रत्येक जीवाला सहा प्रकारचे विकार आहेत. अस्ति, जायते, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते आणि विनश्यते. मातेच्या गर्भात जीवाचे अस्तित्व जाणवते (अस्ति), त्याचा जन्म होतो (जायते), त्याची वाढ होत राहते (वर्धते), रोगाचा प्रादुर्भाव होतो (विपरिणमते), तो क्षीण होत जातो (अपक्षीयते) आणि शेवटी त्याचा विनाश होतो (विनश्यते). असे षड्भावविकार प्रत्येक जीवाच्या ठिकाणी अनिवार्यपणे वसतात. म्हणून जन्म-मरणाचा खेळ अखंडपणे चालू असतो 'सिद्धान्त शिखामणी'त आचार्य म्हणतात:

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।
जन्तुर्मरणजन्माभ्यां परिभ्रमति चक्रवत् ॥५-६३॥

जन्मलेल्या जीवाचा मृत्यू होतो आणि मृत्यू पावलेला जीव पुन्हा जन्माला येतो. असे हे जन्ममृत्यूचे चक्र अखंड भ्रमत असते. मृत्यू पाहून काही लोकांना आश्चर्य वाटते. आत्ता हा जिवंत होता अन, आत्ता कसा मेला? परंतु माणसाच्या मृत्यूचे आश्चर्य वाटायला नको, तो इतके दिवस जगला कसा याचेच आश्चर्य वाटले पाहिजे. कारण शरीरात नवद्वारे आहेत. चंचल प्राण त्यातून केव्हाही निघून जाऊ शकला असता. परंतु इतके दिवस गेला नाही हेच आश्चर्य!

मृत्यू हा अनिवार्य आहे. त्यापासून कोणाचीही सुटका नाही. मेलेल्या प्राण्याला जीवदान देणारे संतमहात्मेदेखील एक दिवस मरून गेले आहेत. म्हणून मृत्यू हा 'ध्रुव' आहे, निश्चित आहे. चिरंजीवी याचा अर्थ केवळ

अधिक काळ जगणारे. त्यांना देखील मृत्यू अटळच आहे. त्यांचे चिरंजीवित्व फार तर चार युगांपुरते. जन्मलेल्या जीवाचा मृत्यू निश्चित आहे हे सत्य आपल्या अनुभवकक्षेत बसते. परंतु मेलेल्या जीवांचा पुन्हा जन्म होतो हे मात्र आपल्या अनुभवाला येत नाही. तेही सत्यच आहे: 'ध्रुवं जन्म मृतस्यच', मेलेल्याचा जन्मदेखील निश्चित आहे. मृत्यू हाच मोक्ष असता तर मेलेल्या जीवाला पुन्हा जन्म घेण्याचे प्रयोजन राहिले नसते. असा हा जन्म-मरणाचा फेरा. गवत पावसाळ्यात उगवते, उन्हाळ्यात मरते, पुन्हा पावसाळा आला की तरारून उठते.

एकदा एक खेडूत प्रथमच मुंबईला गेला. माणसांची प्रचंड गर्दी आणि तुडुंब भरून वाहणाऱ्या लोकलगाड्या, बसेस् पाहून त्याला वाटले की लोक हे गाव सोडून जात आहेत. रात्र झाल्यावर लोकांची गर्दी ओसरली तेव्हा त्याला प्रामाणिकपणे वाटले की सर्व लोक गाव सोडून गेले असून आता हे गाव आपल्या मालकीचे होणार. परंतु दुसरा दिवस उजाडताच पुन्हा माणसांची गर्दी रस्त्यांनी वाहू लागली. खेडुताला आश्चर्य वाटले. असे रोज पाहिल्यावर त्याने एकाला विचारले,

'बाबारे, एवढी माणसं कुठून येतात? कुठं जातात?'

तो उत्तरला, 'ही माणसं घरून येतात, ऑफिसात, दुकानात कामावर जातात आणि परत घरी जातात. त्यांचे भ्रमण अखंड चालू आहे.'

जन्म आणि मृत्यूची भ्रमंती कधीही थांबणारी नाही. अशी ही 'जीवाची मुंबई' नेहमी चाललेली आहे.

अतिसामान्य जीवजंतू असो की अवतारी महापुरुष असो मरण कोणालाही चुकले नाही, चुकणारही नाही. राम-कृष्णासारखे महापुरुष देखील याच मरणपंथाने गेले. ही वाट सगळ्यांच्या पायाखालची. ती मुद्दाम शोधावी लागत नाही. चालण्याजोगी आणि चालावी लागणारी अशी ही एकमेव वाट आहे. तरीही वेडी माणसे मृत्यूची भीती बाळगतात. त्याचा उल्लेख करणे कटाक्षाने टाळतात. एक ईश्वर सोडला तर मृत्युइतके आपल्या जवळ दुसरे कोणीही नाही. ज्याक्षणी जीवाचा जन्म होतो त्याक्षणीच त्याचा मृत्यूचा प्रवास सुरू झालेला असतो. तरीही लोक मुलाचा वाढदिवस मोठ्या आनंदाने साजरा करतात. ज्ञानेश्वरांना याचे मोठे आश्चर्य वाटते. ते म्हणतात:

जंव जंव बाळ बळिया वाढे। तंव तंव भोजे नाचती कोडे।
आयुष्य निमालें आतुलियेकडे। ते ग्लानिचि नाहीं॥

आपले बाळ एक वर्षाचे झाले म्हणजे लोक आनंदाने कौतुक करतात, नाचतात. परंतु बाळाच्या आयुष्यातील एक वर्ष कमी होऊन तो मृत्यूच्या अधिक जवळ गेला हे या वेड्यांना कसे कळत नाही?

वीरशैव-सिद्धान्तात पूर्वजन्म आहे परंतु पुनर्जन्म नाही. 'एकेन जन्मना मुक्तिः वीराणां तु महेश्वरी.' वीरशैवांना एकाच जन्मात मुक्ती मिळते, असे आगमात शिव पार्वतीला सांगतात. परंतु केवळ वीरशैव-कुळात जन्मला की पुनर्जन्म नाही, असा याचा अर्थ नाही. 'वी' म्हणजे विद्या आणि 'र' म्हणजे रमणारा. शिव आणि जीव एकच आहेत अशा अभेदबोधक विद्येत जो रममाण होतो तोच खरा 'वीर'शैव. ही विद्या ज्याला प्राप्त होते त्याला पुनर्जन्म घेण्याचे प्रयोजन नाही. या अर्थाने वीरशैवांना पुनर्जन्म नाही, असे म्हटले जाते.

मृत्यू हा सहज, स्वाभाविक आहे. श्रीकृष्ण अर्जुनाला हेच सांगतात: 'न त्वं शोचितुमर्हसि।' मृत्यूबद्दल शोक करू नकोस. कारण तो स्वाभाविकच आहे. त्यातून कोणाचीच सुटका नाही. जुने, जीर्ण वस्त्र बदलावे आणि नवे धारण करावे तसा जीवात्मा नवा देह धारण करतो. त्यासाठी शोक कशाला करायचा? म्हणून मृत्यूची भीती नको, त्याविषयी शोक नको. जन्म आणि मृत्यू ही जीवनातली सत्ये आहेत. ही सत्ये समजून घ्यावी आणि त्यातून सुटकेचा मार्ग कोणता त्याचे ज्ञान प्राप्त करावे. हा मार्ग ज्याला सापडतो त्याचा जन्ममृत्यूचा प्रवास संपण्याची चिन्हे दिसू लागतात.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# जीवाला जाळणारे दु:ख

जिज्ञासू सद्भक्तांनो,

. या संसारात सुखापेक्षा दु:खभोगच आपल्या अधिक वाट्याला येतात. कारण संसार हा दु:खदायक आहे. शरीर हे सुखदु:खाचे भोगायतन आहे. म्हणून शरीर असेपर्यंत सुखदु:खातून माणसाची सुटका नाही. दु:ख अग्नीसारखे जीवाला जाळून टाकते. त्याच्या वेदना, जो भोगतो त्यालाच कळतात. कोणते ना कोणते तरी दु:ख जीवाच्या वाट्याला कायमचे आलेले असते. दु:खातून जीवाची सुटका नाही. हे दु:ख उत्पन्न कोठून होते? ते होते आपल्या कर्मांतून. आपली कर्मेच त्यांची निर्मिती करतात. ते काही आकाशातून पडत नाही आणि अकारण आपल्या वाट्याला येत नाही. जीव स्वत:च्या कर्मसुत्राने बांधलेला असतो. कर्म कधी त्याला दु:ख भोगायला नेईल तर कधी सुख भोगायला. डी.व्ही.गुंडप्पांनी याचे सुरेख वर्णन केले आहे:

जीवन हा एक टांगा आहे.
प्रारब्ध त्याचा स्वामी
आणि जीवात्म्या, तू टांग्याला जोडलेला घोडा
प्रारब्ध सांगेल त्याप्रमाणे
लग्नमंडप असो की स्मशानयात्रा
तिकडे तुला जावे लागेल हे अज्ञानी जीवा!

असे आपले प्रारब्धकर्म आपल्याला भरकटत नेत असते. फुलापेक्षा काटेच आपल्याला अधिक का बोचतात? मृदुतेऐवजी काठिन्यच आपल्या वाट्याला का येते? पूर्ण उमलण्याआधी फूल गळून का पडते? याचे एकच कारण ते आपले प्रारब्ध. आपण आपल्या कर्मानेच आपली वाट निवडली. सुगंधाचे गाव टाळून आपणच दुर्गंधीची वाट पत्करली याला कोण काय करणार?

दु:ख अनेक रूपांनी आपल्याला भेटत असते. त्याची हजार रूपे

आहेत. जन्म हेच पहिले दुःख आहे. बाळ जन्मताच रडते. इथूनच झाली दुःखभोगाची सुरुवात. कबीर म्हणतात :

'जब तुम आये जगमें जग हंसे तुम रोय'

बाळ रडले तर जग हसते. त्याचे जन्मदुःख जगाला कुठे कळते ? जीव जन्माला आल्यावर रडतो, आयुष्यभर दुःखे भोगून रडतो आणि शेवटी मरताना इतरांना रडवून जातो. असे रडणे आयुष्याला कवटाळून बसले आहे. जीव आशाळभूतपणे भविष्यकाळात सुख मिळेल असे स्वप्न पाहत असतो. पण भोगत असतो मात्र दुःखच. कधीकधी दुःखातच सुख मानून तो वेड्यासारखा खूष होत असतो. कोणा जवळ पैसा नाही म्हणून दुःखी, तर कोणी अधिक पैसा आहे म्हणून दुःखी. कोणी अधिकार नाही म्हणून तर कोणी अधिकार आहे म्हणून दुःखी. कोणी मुलगा आहे म्हणून तर कोणी मुलगा नाही म्हणून. कोणी उपाशी राहून दुःखी तर कोणी जेवण करून दुःखी. असे सगळे या ना त्या प्रकारे दुःख भोगत असतात. विष खाऊनही माणसे मरतात तर हल्ली साखर खाऊनही मरतात. असे दुःख सगळीकडे भरलेले आहे. दुःखाला सुख समजण्याची प्रवृत्ती जीवांत अधिक दिसते. म्हणून :

सुख पाहता जवापाडे। दुःख पर्वताएवढे॥

हे संतवचन अर्थपूर्ण आहे. एक कवी म्हणतो :

तारीख तुम्हे बतलायेगी दुनिया में सुख का नाम नही।
जिस दिल में हवस का शिक्का हैं उस दिल को आराम नही॥

मृत्युसमयी तुम्हाला कळेल की जगात सुख नावाची वस्तू नाही परंतु ज्याच्या हृदयात आशेची मुद्रा उमटलेली असते त्याच्या हृदयाला आराम कधी मिळत नाही. कारण सुखाचा शोध सतत होतच असतो. सुख शोधून सापडणारे नाही, कारण ते बाहेर नाहीच. आत आहे. त्याच्या

शोधाची दिशाच चुकलेली आहे.

एक म्हातारी आपल्या घरात गोधडी शिवत बसली होती. दोरा ओवताना तिच्या हातातून सुई खाली पडली ती शोधू लागली तरी तिला सापडेना. रस्त्याने जाणाऱ्या एकाने विचारले,

'आजी, काय शोधते आहेस तू?'

'शिवताना सुई खाली पडली ती शोधते आहे बाबा,' म्हातारी उत्तरली.

'मग अंधारात कशी दिसेल? उजेडात पाहा.' असे म्हणून तो निघून गेला.

म्हातारी रस्त्यावर आली आणि प्रकाशात सुई शोधत बसली. जाणाऱ्या-येणाऱ्यांनी तिची चौकशी केली. तिला मदत करावी म्हणून काहीजण सुई शोधत बसले. मागाहून येणाऱ्या काही लोकांनी आधीच्या लोकांकडे पाहून काहीतरी हरवले म्हणून शोधायला सुरुवात केली. अशी रस्ताभर शोधणाऱ्या लोकांची रांग लागली.

एका सज्जन गृहस्थाने रस्त्यावरची गर्दी पाहून एकाला विचारले,

'काय शोधतो आहेस तू?'

'मला माहीत नाही. तो शोधतो आहे म्हणून मी शोधतो आहे.

'गृहस्थाला आश्चर्य वाटले. त्याने प्रत्येकाला विचारले. उत्तर वरीलप्रमाणेच मिळाले.विचारता विचारता तो म्हातारीपाशी पोहोचला. तिला विचारले. ती म्हणाली,

'सुई हरवली ती शोधते आहे.'

'कुठे हरवली?' त्याने विचारले.

'घरात.'तिने उत्तर दिले.

'मग रस्त्यावर कशाला शोधते आहेस? सुई घरात हरवली आणि शोध रस्त्यावर चालू आहे!'

ती म्हणाली, 'मी घरातच शोधत होते. पण तुझ्यासारख्या एका शहाण्याने मला उजेडात शोधायला सांगितले. म्हणून मी उजेडात शोधत आहे!'

सुई घरात हरवली असेल तर ती रस्त्यावर शोधणे जेवढे वेडेपणाचे तेवढेच सुख आपल्या अंतरंगात असताना त्याचा बाहेर शोध घेणे वेडेपणाचे. म्हणून खरे सुख हृदयात आहे, दुःख बाहेर भरलेले आहे. अंतर्मुख

होऊनच सुखाचा शोध घेतला पाहिजे.

दुःख हे अनंत प्रकारचे असले तरी 'सिद्धांतशिखामणी'त आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या तीन प्रकारांत त्याचा समावेश केला आहे. यांनाच तापत्रय म्हणतात. शरीर आणि मन यांच्यापासून जे दुःख उत्पन्न होते ते आध्यात्मिक होय. त्यातही वात, पित्त, कफ या त्रिदोषांमुळे रोग उत्पन्न होऊन शरीराला होणारे दुःख हे बाह्य आणि काम, क्रोध, लोभ इत्यादी मनोवृत्तींपासून होणारे दुःख हे आंतर आध्यात्मिक दुःख आहे. या मनोवृत्तींमुळे मनुष्याचे अध:पतन होते. म्हणून गीतेत या तिन्हीला 'नरकाचे द्वार' असे म्हटले आहे. राजा, चोर, साप, वाघ इत्यादींपासून होणारे आधिभौतिक दुःख आणि ग्रह, यक्ष, भूत, प्रेत इत्यादींद्वारा होणारे ते आधिदैविक दुःख.

असे हे संपूर्ण जीवन व्यापून टाकणारे हे दुःख. याची निवृत्ती कशी होणार ? औषधोपचाराने शारीरदुःखे कमी होतील. मणी, मंत्रपठण यांमुळे मानसिक, आधिभौतिक ही दुःखे कमी होतील. दुःखविस्मरणासाठी काहीजण मद्यपान, अंमली पदार्थांचे सेवनही करतात. त्यामुळे तात्कालिक दुःखविस्मरण होत असले तरी ते नष्ट होत नाही. त्याचे मूळ कारण आपले कर्म, मी, माझे हा अभिमान आहे. तो समूळ नष्ट झाला तरच दुःखाची आत्यंतिक निवृत्ती होऊ शकेल. या दुःखनिवृत्तीचा उपाय सांगण्यासाठीच कपिलमुनींनी सांख्यशास्त्राची रचना केली आणि वीरशैवाचार्यांनी शिवशास्त्राचा उपदेश केला.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# शरीराकडून आत्म्याकडे

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मानवजन्म दुर्लभ आहे, 'दुर्लभं मानुषं जन्म' असे संतमहात्म्यांनी सांगितले आहे. कारण मानवजन्मातच जीवाला स्वत:चे भले किंवा वाईट करून घेता येते. म्हणून चौऱ्यांशी लक्ष योनींत मानवयोनी सर्वश्रेष्ठ आहे. शरीर हे भोगायतन असले तरी ते धर्मसाधन देखील आहे. ते नश्वर असले तरी शाश्वत आत्मज्ञानप्राप्तीसाठी आवश्यक असते. म्हणून नरदेह श्रेष्ठ.

परंतु या शरीराचे आपण फारच कोडकौतुक करतो. ते धुतो, स्वच्छ करतो, सजवतो,नटवतो. कधी नको इतक्या आभुषणांनी विरूपही करतो. शरीराची आपण जेवढी काळजी घेतो त्याच्या शतांशानेही मनाची घेत नाही. मनात विकारांचे तण वाढले तर वाढले. दुर्गुणांचे कंद फोफावले तर फोफावले. त्याचे आपल्याला काय? शरीर स्वच्छ केले की झाले. जणू शरीर म्हणजे आपण. शरीर म्हणजे आत्मा. बहुसंख्य माणसे देहात्मबुद्धीने जन्मभर बांधलेली असतात. त्यांची दृष्टी शरीरापलीकडे कधी पोचतच नाही.

माणसाला शरीरसौंदर्याचा केवढा अभिमान! सकाळी उठल्याबरोबर आरशात आपला चेहरा पाहण्याची सवय. पूर्वसूरींनी सांगितले,'प्रभाते करदर्शनम्'-पहाटे उठल्याबरोबर प्रथम आपला हात पहावा. कारण या हातानेच सत्कर्मे करायची आहेत. या हातानेच आपले भाग्य घडवायचे आहे. पण पहाटे उठून तो हात पहात नाही, आरशात आपला चेहरा पाहतो. आणि दिवस वाईट गेला तर 'सकाळी उठून कोणाचे तोंड पाहिले कुणास ठाऊक?' अशी तक्रार करतो. शरीराचे सौंदर्य त्वचेइतके खोल. त्वचा खोलून पहा आपण किती सुंदर आहोत ते! अस्थी, मज्जा आणि मांस यांचा गोळा म्हणजे शरीर. त्यात मल साठलेला असतो. शरीर म्हणजे मलकोषच जणू. त्याची नवही द्वारे सारखी स्रवत असतात. मंगलद्रव्ये देहात गेल्यावर अमंगल होतात. म्हातारपणी तर शरीराची गलितगात्र अवस्था

होते. मान लुटूलुटू हालते, हातापायांना कंप सुटतो, दृष्टी अधू होते. तरीही अशा शरीरावर किती गाढ प्रेम! तरुण-तरुणींसमोर त्यांचे म्हातारपण लख्ख उभे केले तर ते लग्न करतील की नाही याची शंकाच आहे.

जीवाची देहात्मबुद्धी नष्ट व्हावी म्हणून आचार्यांनी देहनिंदा केली आहे. शरीराचे, त्याच्या आतील मलाचे, वार्धक्याचे, रोगांचे बीभत्स वाटेल असे वर्णन केले. परंतु या निंदास्पद अशा शरीरातच सत्, चित्, आनंदस्वरूपी आत्म्याचा निवास आहे. शरीर अमंगल आहे म्हणून शरीराचा त्याग करावा असे आचार्य सांगत नाहीत. तर देहात्मबुद्धीचा म्हणजे देह आत्मा आहे या भावनेचा त्याग करावा, असे ते सांगतात. निजगुण शिवयोगी म्हणतात:

पडेवे नीन्यंदिगे परमुक्तिसुखवनु
क्यडुव कायद मोहवनु माणे मनुजा?

तू कधी परम मुक्तीचे सुख प्राप्त करून घेणार नश्वर शरीराचा मोह न सोडता?

नित्य, शुध्द, आनंदस्वरूप असा आत्मा सोडून अनित्य, अशुध्द व दु:खरूप शरीराच्या मागे कोण विवेकी पुरुष लागेल? शरीरापेक्षा आत्मा अधिक सुंदर आहे. 'आत्मा वा अरे द्रष्टव्य:' असे उपनिषदात म्हटले आहे. आत्मा हा दर्शनीय आहे. अर्थात् सुंदर आहे. आत्म्याच्या सौंदर्यासमोर शरीरसौंदर्याचा काय पाड?

परंतु आत्मज्ञानप्राप्तीसाठी शरीराचे रक्षण करायलाच हवे. सात्त्विक आहाराने त्याचे पोषण करावे. सात्त्विक वेषभूषेने त्याला सजवावे. देहात्मबुद्धी आत्म्याकडे वळवता आली तरच देहाभिमान संपून जाईल. आत्मसौंदर्याचे भान येईल. धर्माच्या या साधनाला, शरीराला साधनाएवढेच महत्व द्यावे, साध्याएवढे देऊ नये. शरीराच्या ठिकाणी ममत्वभाव नसावा तर देहभाव असावा. शरीराप्रमाणेच शरीराशी संबंधित पत्नी, पुत्र, कलत्र इत्यादी विषयीचे ममत्व क्षीण झाले तरच आत्मस्वरूपाकडे वळणे शक्य होईल. असे घडले तर विवेकपूर्ण वैराग्याची प्राप्ती होऊन साधकाच्या मनात शिवभक्तीचा उदय होतो आणि शरीराकडून आत्म्याकडे असा विलक्षण प्रवास सुरू होतो.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# ‘माणसा’तला पशू

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जगातल्या सर्व पशूंमध्ये मनुष्य हा देखील एक पशूच आहे. देवत्व सोडा, पण त्याच्या ठिकाणी साधे मनुष्यत्वही क्वचित्च दिसते. माणूसरूपी वेलीवर अमानुषपणाची फळे लगडलेली दिसतात. कडुनिंबासारखा त्याच्याही ठिकाणी कडवटपणा निर्माण झाला आहे. पशूंच्या कडून कधीही घडणार नाहीत अशी अमानुष कर्मे ‘माणूस’ करतो. अशा या माणूस नामक पशूला प्रथम मनुष्यत्व आणि नंतर देवत्व प्रदान करतो तोच गुरू.

मनुष्य हा सामान्य पशू नाही तर तो विलक्षण पशू आहे. सगळ्या पशूंचे गुण त्याच्या ठिकाणी कमी अधिक प्रमाणात दडलेले आहेत. माकड हे केवळ माकड आहे, गाढव हे केवळ गाढव आहे, कुत्रा हा केवळ कुत्रा आहे. परंतु मनुष्य मात्र थोडे माकड, थोडे गाढव, थोडा कुत्रा असा विलक्षण आहे. चौऱ्यांशी लक्ष योनींचे संस्कार घेऊनच तो जन्माला आला आहे. म्हणून सर्व पशूंचे गुण त्याच्या ठिकाणी दिसतात. तो शाकाहारही करतो आणि मांसाहारही करतो. सर्व प्राण्यांचे आवाजही आपल्या स्वरयंत्रातून काढतो. म्हणून माणसांत पशू नेहमी दिसतो, मात्र ‘माणूस’ शोधून देखील सापडत नाही. ‘मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये’ असे गीतेत म्हटले आहे. ‘हजार मनुष्यांत एखादाच मनुष्य अध्यात्ममार्गात प्रवृत्त होतो’, असा त्याचा अर्थ असला तरी ‘हजार मनुष्याकृतींत एखादाच मनुष्य असतो’, असा त्याचा अर्थ करायला हरकत नाही.

धारवाड जिल्ह्यातील गरग गावी मडिवाळ शिवयोगी होऊन गेले. त्यांच्याविषयी एक कथा प्रसिध्द आहे. मडिवाळ शिवयोगी सदोदित नग्नावस्थेत राहत असत. एकदा त्यांच्या भेटीसाठी हुबळीचे सिद्धारूढ स्वामी येणार होते. त्यादिवशी कधी नव्हे ते मडिवाळ शिवयोगी लंगोटी घालून बसले. त्यांच्या या कृतीचे सगळ्यांना मोठे आश्चर्य वाटले. कुतूहल आवरेना म्हणून एका शिष्याने विचारले.

‘गुरुदेव, आपण नेहमी नग्न राहता, मग आजच लंगोटी का बरे

घातली ?'

तेव्हा मडिवाळ शिवयोगी हसून उत्तरले,

'आज मला एक 'माणूस' भेटायला येणार आहे. पशूंसमोर नग्न राहिले तरी चालते, माणसासमोर मात्र लाज झाकावी लागते. म्हणून आज लंगोटी घातली.'

पशूंच्या ठिकाणी एखादा विशेष गुण असतो. उदा : कुत्रा हा अतिशय स्वामिनिष्ठ असतो. मनुष्य स्वामिनिष्ठ, प्रामाणिक असेलच असे निश्चयाने सांगता येत नाही. तो कदाचित प्रामाणिकपणाचे नाटकही करीत असेल! म्हणून पशूंवर जेवढा विश्वास ठेवता येतो तेवढा माणसावर ठेवता येत नाही. 'विश्वासघात' हा शब्द माणसांच्या दुनियेतला, पशूंच्या नव्हे. 'केसाने गळा कापणे' ही माणसाचीच करामत. पशू स्वजातीयाची हत्या करीत नाही. माणूस मात्र माणसालाच ठार करतो. मनुष्याने केलेल्या नरसंहाराच्या कहाण्यांनी इतिहासाची किती पाने रक्ताळली आहेत! माणसाने स्वार्थासाठी महायुध्दे घडवून आणली, पंजाब-काश्मीरमध्ये वाहणारे मानवी रक्ताचे पाट कोणती कहाणी सांगतात? हिरोशिमा, नागासाकी या त्याच्या 'कलाकृती' आहेत. माणसानेच माणसाच्या जीवनाची किंमत शून्य केली. माणसावर माणसानेच अत्याचार केले. बलात्कार, खून, दरवडे या माणसाच्या पराक्रम-गाथेतल्या कथा आहेत.

एकदा पोट भरले की पशूंना अधिक काही लागत नाही. माणसाचे पोट मात्र कधीच भरत नाही. त्याला एक घर पुरेसे नसते, दहा घरे हवी असतात. एक वस्त्र पुरेसे नसते, पन्नास वस्त्रे हवी असतात. अशी कधीही न सरणारी माणसाची विलक्षण भूक. तो अंतर्बाह्य काटेरी आहे. कुणाला कृतीने दुखावेल तर कुणाला शब्दाने. त्याचा स्वार्थ हाच त्याला परमार्थ वाटतो. दुसऱ्याचे दुःख पाहून त्याला आत कोठेतरी आनंद होत असतो. एखादे झाड कोणी तोडले तर शेजारच्या झाडाला वेदना होतात. माणसाला मात्र अशी वेदना स्पर्शत देखील नाही. वृक्षाजवळ समानुभूती असते. माणसाजवळ मात्र कोरडी सहानुभूती! काही माणसांजवळ तर ती देखील नसते.

कोणी एक महात्मा अरण्यात राहत होता. ईश्वरचिंतनात त्याचा काळ व्यतीत होत असे. वाघ, सिंह, सर्प हे हिंस्त्र पशूदेखील त्याच्या सहवासात निर्वैर वृत्तीने राहत. एका मनुष्याने अरण्यात गेल्यावर ते दृश्य

पाहिले. आश्चर्यचकित होऊन त्याने त्या महात्म्याला वंदन करून विचारले,

'महाराज, तुम्हाला वाघ, सिंह या क्रूर प्राण्यांची भीती वाटत नाही?'

'नाही' तो महात्मा शांतपणे उत्तरला,' वाघसिंहापेक्षाही अत्यंत क्रूर असे जे मन त्यावर आम्ही नियंत्रण ठेवतो. मग वाघसिंहाची भीती कसली?'

माणसाच्या मनाचे हे विदारक दर्शन आहे. असा विकारांनी बरबटलेला, ऐहिक सुखातच सर्वस्व मानणारा, आत्मस्वरूपाची, विस्मृती झालेला हा माणूस. त्याच्यावर संस्कार करून त्याचे हरवलेले मनुष्यत्व मिळवून देणारा आणि त्याच्यावर कृपा करून शिवस्वरूपाची प्राप्ती करून देणारा श्रीगुरू किती श्रेष्ठ असेल?

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# गुरुकृपेची ओल

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माणसाच्या अंधारलेल्या, दिशाहीन जीवनात प्रकाश फुलवतो तो श्रीगुरू. फूल पूर्ण उमलून त्याचा सुगंध दरवळू लागला की भ्रमर आपोआप फुलाकडे आकर्षित होतो. तसे मनुष्याचे हृदय गुरुकृपेसाठी व्याकूळ झाले की गुरूची पावले सहज त्याच्या दिशेने वळतात आणि गुरुकृपेची ओल लाभली की सबंध जीवन कृतार्थ होऊन आत्मज्ञानाने उजळून जाते.

गुरुसंमुख झाल्याविना गुरुकृपा लाभणार नाही. गुरूच्या दिशेने आपण एक पाऊल टाकले किंवा एक पाऊल टाकण्याची तयारी ठेवली तर गुरु आपल्या दिशेने दहा पावले चालत येईल.

एका राजाला एकुलता एक मुलगा होता. काही कारणाने त्याच्यावर राजाचा रोष झाला. राजाने रागारागाने त्याला सीमेबाहेर हाकलून दिले. कालांतराने राजा वृद्ध झाला. त्याचा मुलावरचा राग मावळला आणि मुलाच्या आठवणीने त्याचे डोळे भरून आले. तेव्हा त्याने प्रधानाला बोलावून सांगितले,

'मी आता वृद्ध झालो आहे. राज्याला वारस नाही. तेव्हा सीमापार केलेल्या राजपुत्राचा शोध घ्या. त्याला उंची वस्त्रे अर्पून सन्मानाने राजधानीत घेऊन या.'

राजाज्ञेप्रमाणे प्रधानाने राजपुत्राचा शोध घेतला आणि त्याला राजाकडे येण्याची विनंती केली. परंतु राजपुत्र मनातून राजावर रुष्ट होता. त्याने येण्याचे नाकारले. प्रधानाने राजाला वर्तमान सांगितले. तेव्हा राजा म्हणाला,

'त्याला अर्ध्या वाटेवर घेऊन या तिथे येऊन मी त्याचे स्वागत करीन !

प्रधान निरोप घेऊन राजपुत्राकडे गेला. पण त्याने अर्ध्या वाटेवर येण्यास नकार दिला. राजाने पुन्हा निरोप दिला,

'अर्ध्या वाटेच्या अर्ध्या अंतरावर ये. मी स्वागत करीन !

राजपुत्राचा नकार आला. अंतर कमी करीत राजाने शेवटी निरोप

पाठवला की, 'माझ्या दिशेने फक्त एक पाऊल पुढे ये. मी तुझे स्वागत करीन !

राजपुत्राने विचार केला की, राजा इथपर्यंत एका पावलाच्या अंतरापर्यंत येतो. मग त्याला एक पाऊल अधिक टाकून मला भेटणे काय अवघड? त्याने पुन्हा नकार दिला. नकार ऐकल्यावर राजा म्हणाला,

'माझ्या दिशेने एक पाऊल टाकण्याची जर त्याची तयारी नसेल तर त्याच्या मनात माझ्याबद्दल स्नेह नाही हे निश्चित. म्हणून आता त्याची मला गरज नाही!

आपल्या मनात जर गुरूविषयी किंचित देखील ओढ नसेल तर गुरूची पावले आपल्या दिशेने कशी वळतील? देणारा तयार असावा तसा घेणाराही तयार असायला हवा. गुरू 'ये हृदयीचे ते हृदयी' घालतो. म्हणून घेणारे हृदयदेखील घेण्यासाठी सिद्ध असावे लागते.

गुरू या शब्दाचा अर्थ 'अज्ञान-अंध:काराचे निवारण करणारा' असा आहे. जीवाला शिवत्वाची प्राप्ती करून द्यायला शिवानेच गुरूरुप धारण केले. गुरुशरण झाल्याविना गत्यंतर नाही. शिवज्ञानासाठी प्रत्येकाला गुरुशरण व्हावे लागते :

'शिवपथवनरिवडे गुरुपथवे मोदलु'

गुरू हा चालता बोलता शिवच आहे. शिव मायाशक्तीमुळे आपल्या दृष्टिसमोर येत नाही. गुरू मात्र आपल्याशी बोलतो, आपले शंकासमाधान करतो. शिवभक्तीमुळे ऐहिक आणि पारलौकिक भोग प्राप्त होतात तर गुरुभक्तीने ऐहिक पारलौकिक भोगांबरोबरच मोक्षदेखील प्राप्त होतो. शिव हा भोगप्रदायक आहे तर गुरू मात्र भोगमोक्षप्रदायक आहे. ज्ञानोपदेश करण्याचा अधिकार केवळ गुरूलाच असतो. शिवाच्या क्रोधापासून गुरू शिष्याचे रक्षण करू शकतो. परंतु गुरू ज्यावर रुष्ट झाला त्याचे शिव देखील रक्षण करू शकत नाही.

गुरुकृपेच्या लाभासाठी गुरुसेवेत रत व्हायला हवे. गुरूसाठी आयुष्य वेचणाऱ्या आणि गुरुकृपेच्या लाभाने कृतार्थ होणाऱ्या असंख्य गुरुभक्तांच्या कथा भारतीय वाङ्मयात विखुरलेल्या आहेत. आरुणी, सत्यकाम जाबाल, उपमन्यू, पद्मपादाचार्य, ज्ञानेश्वर, नामदेव, शरीफ, उरुलिंगपेद्दी अशा अनेक

गुरुभक्तांची नावे सश्रद्धांनी आपल्या हृदयांत जपून ठेवण्याजोगी आहेत. आप्तसेवा, अंगसेवा, स्थानसेवा, सद्भावसेवा असे गुरुसेवेचे चार प्रकार आहेत. आपल्या आप्तासारखी गुरूची सेवा करणे ही आप्तसेवा, स्वत: गुरूचे चरणसंवाहन इ. करणे ही अंगसेवा, घर, तपोभूमी, शेत, इत्यादी गुरूंच्या स्थानांची निगा राखणे ही स्थानसेवा आणि गुरुविषयी सदोदित सद्भाव बाळगणे ही सद्भावसेवा. गुरुसेवा सहा महिने वर्षभर किंबहुना गुरू प्रसन्न होईपर्यंत करायला हवी.

स्वत: जातीने गुरुसेवा केली तरच तिचे फळ मिळते.गुरूच्या सेवेसाठी भाडोत्री सेवक ठेवून गुरुसेवेचे फळ मिळणार नाही. दुसऱ्याने भोजन केले तर आपले पोट कसे भरेल? म्हणून देवपूजा आणि गुरुसेवा स्वत:च करायला हवी. गुरुकृपेने विद्या फलप्रद होते. तर त्याच्या अवकृपेने निष्फळ होते. जशी गुरू परशुरामाच्या अवकृपेमुळे कर्णाची विद्या निष्फळ झाली तशी. गीता सांगते:

तद्विद्धी प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया॥

गुरूला प्रथम प्रणिपात करावा, नंतर सेवा करावी त्यानंतर प्रश्न विचारावा, म्हणजे विद्यालाभ होईल. प्रणिपाताशिवाय, गुरुसेवेशिवाय विद्यालाभ होणारच नाही. जो विनित होतो त्यालाच विद्या आणि अनुग्रह प्राप्त होतो. जो मुसळासारखा ताठ असतो त्याला कशी विद्या मिळेल?

एकदा सम्राट अशोकाच्या दरबारात एक बौद्ध भिक्षू आला. त्याला पाहताच सम्राटाने सिंहासन सोडले, किरीट काढून ठेवला आणि त्याच्या पायावर डोके ठेवले. ही घटना पाहून सम्राटाचा प्रधानमंत्री नाराज झाला. एवढा मोठा सम्राट आणि त्याने एका अकिंचन भिक्षूच्या पायावर डोके ठेवावे म्हणजे काय? मंत्र्याने आपली नाराजी अशोकाजवळ व्यक्त केली. अशोक काही बोलला नाही. काही दिवसांनी त्याने एक बंद पेटी मंत्र्याच्या स्वाधीन करून सांगितले,

'यातल्या सर्व वस्तू बाजारात नेऊन विकून टाक!'

मंत्री निमूटपणे बाजारात गेला. पेटी उघडून पाहिल्यावर चकित झाला. पेटीत सर्व प्राण्यांची मुंडकी भरलेली होती. त्यात माणसाचे देखील एकः मुंडके होते. लिलाव पुकारून त्याने एकेक करीत सर्व प्राण्यांची

मुंडकी विकली. माणसाचे मुंडके मात्र कोणी घेईना. तो परतला. आणि घडलेले सर्व सम्राटाला सांगितले. सम्राट म्हणाला,

'माणसाचे मुंडके कोणी विकत घेत नाही? जा बाजारात अन् फुकट देऊन टाक कोणाला.'

त्याप्रमाणे मंत्री बाजारात गेला. परंतु मानवी मुंडके फुकट देखील घ्यायला कोणी तयार झाला नाही. अखेर कंटाळून मंत्री परत फिरला आणि त्याने सर्व हकीकत सम्राटाच्या कानावर घातली.

'काय इतर प्राण्यांच्या मस्तकाइतकी किंमत माणसाच्या मस्तकाला नाही?'

मंत्री म्हणाला, 'फुकट देखील घ्यायला कोणी तयार नाही.'

'ज्या मस्तकाला बाजारात थोडी देखील किंमत नाही ते मस्तक गुरुचरणावर ठेवण्यात कोणता कमीपणा आहे?' सम्राट म्हणाला, 'जे कुणी फुकट घ्यायला तयार नाही त्याचा गुरू प्रेमभराने स्वीकार करतात अन् वर आशीर्वादही देतात!' मंत्री मनोमन काय उमजायचे ते उमजला.

गुरू हा भूलोकीचा चालता बोलता शिवच. 'न गुरोरधिकम्' अशी गुरुविषयीची प्रत्यक्ष शंकराची त्रिवार साक्ष आहे. गुरू ही शिष्याची माऊली. आई लेकराचे सर्व लळे पुरवते. त्याची सर्वतोपरी काळजी घेते. चिखलात बरबटून मुलगा घरात आला तर वडील त्याला जवळ करीत नाही. त्याला आईकडे पाठवतो. आई असे मूल प्रथम आले तर स्वत:च त्याला स्वच्छ करते. आणव, कार्मिक, मायीय या मलांनी माणूसही असाच बरबटलेला आहे. गुरुमाऊली तरीही त्याला जवळ करते. त्याच्यावर वेध, मंत्र, क्रिया हे दीक्षासंस्कार करून त्याला मलांपासून मुक्त करते आणि शिवसाक्षात्काराला पात्र बनवते.

असा हा करुणाबहळ गुरू लौकिकात दिसतो तरी कसा? तो कसा ओळखावा? त्याची लक्षणे कोणती ? ती जगद्गुरू रेणुकाचार्यांनी सांगितली आहेत. निर्मल अंत:करणाचा, आत्मानात्मविवेकसंपन्न, विरागी, लोकप्रसिद्ध, शिवसिद्धांताचा ज्ञाता, इष्टलिंगधारी, शिवाचारसंपन्न इत्यादी सुलक्षणांनी तो युक्त असतो. अशाच गुरूला सर्वभावे शरण जावे.

गुरू हा ब्रह्मदेव आहे, कारण तो शिष्याच्या मनात उत्तम विचारांची सृष्टी निर्माण करतो. गुरू विष्णू आहे, कारण तो शिष्याच्या सद्बुद्धीचे सदोदित रक्षण करतो. गुरू हा महेश्वर आहे, कारण तो शिष्याच्या

मनातील दुष्प्रवृत्तींचा संहार करतो. गुरू हा साक्षात् परब्रह्म आहे कारण शिष्याला तो स्वरूप प्रदान करतो.

अशा गुरूची कृपा लाभली तरच माणसातील पशुत्व दूर होईल, त्याच्या ज्ञानदृष्टीला फाटा फुटेल आणि त्याला लिंगांगसामरस्याची प्राप्ती होईल.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# उपासनेची वाट

जिज्ञासू सद्भक्तांनो,

माणसाचे मन मोठे चंचल आणि तरल आहे. पाण्यासारखे. पाणी कोणत्याही भांड्यात ओता. ते त्या भांड्याचा आकार धारण करते. तसेच मनही समोरची व्यक्ती, वस्तू पाहून तदाकार होते. समोर जे जे दिसेल ते ते सारे आपल्या मनाला हवे असते. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पंचविषय समोर येताच मनही त्यांच्यासारखे होते, तदाकार होते. मोठ्या उतावीळपणे विषयांच्या ठिकाणी मन सुख शोधत असते. वस्तुत: सुखदु:ख हे मनाचेच धर्म आहेत. पंचविषयांशी तदाकार होणे ही मनाची जुनी सवय आहे. जन्मजन्मांतरापासून ती त्याला लागलेली आहे. मन पुन:पुन्हा तेच ते दळण दळत बसते. तरी त्याची तृप्ती होत नाही. त्यामुळे ते सारखे संसारात भ्रमत राहते. मनाची वृत्ती अधोमुख आहे. पाणी कोठेही ओता. ते उताराकडेच वाहत जाणार. तसे मनदेखील निरंतर विषयांकडेच वाहत राहते.

मनाला ऊर्ध्वमुख केल्याशिवाय मनुष्याची उन्नती होणार नाही. उताराकडे वाहणारे पाणी डोंगरावर चढविणे कठीण असले तरी प्रयत्नसाध्य आहे. त्रास होईल, कष्ट पडतील. पण प्रयत्नाने जमण्यासारखे आहे. जन्मजन्मांतरापासून अधोमुख असलेले, विषयांच्या कच्छपी लागलेले मन ऊर्ध्वमुख करून ईश्वराकडे वळविणे सोपे नाही. पण प्रयत्न केला तर अशक्यही नाही. प्रयत्नाने काय साध्य होत नाही? प्रयत्न केला तर माणूस विष पचवू शकतो, समुद्रात पायवाट शोधू शकतो, एवढेच काय पण समुद्रासारखे विशाल वेद जिभेच्या शेंड्यावर आणून बसवू शकतो. प्रयत्नामुळे मुका वाचाळ होतो आणि पांगळा डोंगर चढून जातो.

पूजा, जप, ध्यान ही मनाचे मुख ऊर्ध्व करणारी साधने आहेत. यामुळे मनाला एक प्रकारची शिस्त लागते. अनिच्छेने का होईना ते पूजा-जप-ध्यान यांत रमू लागते. मन त्रिगुणात्मक आहे. सत्त्व, रज, तम या गुणांनी युक्त आहे. हे तीनही गुण मनात असतात. ज्या गुणाचे आधिक्य असेल त्या गुणाचे मन आहे असे आपण म्हणतो. एखाद्याच्या

ठिकाणी तमोगुण अधिक आहे तो राजस आणि सत्त्व अधिक आहे तो सात्विक. रजोगुण हा स्थिर आहे. बर्फगोळ्यासारखा तो जागेवरून हलत नाही, कोठेही जात नाही. सदैव आळस भरलेला. रजोगुण आहे पाण्यासारखा. पाणी एके ठिकाणी स्थिर राहत नाही. वाहत राहते. तसा रजोगुण सदोदित कार्यात मग्न. हे कर, ते कर अशा कार्यशक्तीने संपन्न. पाणी तापवले की त्याची वाफ होते आणि आकाशात वर जाते. सत्त्वगुण असा वाफेसारखा ऊर्ध्वगामी. वाफ खाली कधीच राहणार नाही. वर जाईल. सत्त्वाची प्रवृत्ती अशीच ऊर्ध्वगामी आहे.

'ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था:'

बर्फाला उष्णता दिली तर तो वितळून त्याचे पाण्यात रूपांतर होते. आणि पाणी तापवले म्हणजे त्याची वाफ होऊन ती आकाशगामी होते. तसा तमोगुण व रजोगुणी मनुष्य उपासनेमुळे सात्त्विक होतो आणि त्याला ऊर्ध्वमार्ग सापडतो. मन सात्त्विक झाले की त्यात ज्ञान प्रकाशते 'सत्त्वात् संजायते ज्ञानम्!' सात्त्विक मनुष्यच ज्ञानप्राप्तीचा अधिकारी आहे.

ज्याच्याजवळ आपण बसतो त्याचा प्रभाव आपल्यावर पडतो. त्याचे गुण आपल्या ठिकाणी उत्पन्न होतात. संसाराच्या अखंड संगतीमुळे मानवी मन सांसारिक झाले आहे. त्याला पारमार्थिक करायचे तर संगत बदलली पाहिजे. संसाराची संगत सोडून ईश्वराशी मैत्री केली पाहिजे. यासाठी उपासनेची आवश्यकता आहे. 'उपासना' म्हणजे आपल्या मनाला ईश्वराजवळ निरंतर बसविणे. असे करता करता मनाला तशी सवय लागेल. ईश्वराचे रूप पाहताना, गुण गाताना मनोवृत्ती तदाकार होईल आणि ज्या जीवनध्येयासाठी योगी, साधू, संत, महात्मे यांनी जीवनभर शोध केला त्या ध्येयाची त्याला प्राप्ती होईल. उपासनेच्या या वाटेवरून चालल्यावर सामान्य मनुष्यदेखील असामान्य होतो.

अशी ही उपासनेची वाट आहे. ज्याला स्वत:च्या ऐहिक जीवनात रस उरत नाही, जो सदैव आपण काही तरी हरवले आहे या भावनेने अस्वस्थ असतो. त्याला ही उपासनेची वाट सापडते. गुरूच त्याला ही वाट दाखवतो. या वाटेवरूनच अनेक महानुभाव चालत गेले आणि मुक्तिपदापर्यंत पोहोचले.

या वाटेवरून चालणाऱ्या वाटसरूला लौकिक दु:खांचा विसर पडतो

आणि अपूर्व अशा आनंदाने त्याचे हृदय भरून जाते. उपासना ही सत्याकडे, शिवाकडे, सुंदराकडे नेणारी वाट आहे. ती आपल्याला अज्ञानाकडून ज्ञानाकडे, अंधारातून प्रकाशाकडे आणि मृत्युकडून अमरत्वाकडे घेऊन जाते. गुरुकृपेने ज्याला ही वाट सापडते तो धन्य होय.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः॥

# चालते बोलते शिवालय

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ईश्वर प्राणिमात्रांच्या हृदयांत वसतो, हे आपल्याला केवळ माहीत आहे. त्याचा अनुभव नाही. कळणे आणि वळणे यांत मोठा फरक आहे. माहिती आणि अनुभव यांत केवढे तरी अंतर आहे! वृक्षवेलीच्या ठिकाणी प्राणशक्ती नांदते, वृक्ष चैतन्यमय आहेत हे आपल्याला माहीत आहे, परंतु वृक्षाखाली उभे राहिल्यावर आपल्यामागे एक चैतन्य उभे आहे अशी जाणीव कितीजणांना होते? अहिंसेचा उद्घोष करणारे किती निर्दयपणे वृक्षावर कुऱ्हाडीचा घाव घालतात! जणू त्यांच्या दृष्टीने झाड तोडणे ही हिंसाच नाही. तसा सर्व चराचरांत ईश्वर भरलेला असला तरी आपल्याला त्याचा अनुभव आला काय?

हा अनुभव घेण्यासाठी, कळणे आणि वळणे यांतील अंतर संपविण्यासाठीच वीरशैवाचार्यांनी इष्टलिंगपूजा सांगितली आहे. ज्याच्या हृदयावर इष्टलिंग सदैव रुळत असते तो अत्यंत पवित्र असतो. कारण त्याने आपल्या शरीरावरच ईश्वराची - शिवाची - प्रतिष्ठापना केलेली असते. असा शिवभक्त म्हणजे चालते बोलते शिवालयच!

देहो देवालय: प्रोक्त:

ज्याचे शरीरच मंदिर झाले त्याच्या पावित्र्याचे काय वर्णन करावे?

पवित्रं तद्विविख्यातं तत्संपर्कात् तनु: शुचि:

इष्टलिंग पवित्र असून त्याच्या संपर्काने देह शुध्द होतो. अशा इष्टलिंगधारकाच्या सहवासाने आसमंतात पावित्र्य फुलते, मनोमालिन्य दूर पळते. मग पंचसूतके त्याला कशी स्पर्श करतील? म्हणून अशा शिवभक्ताला सुतकांचे बंधन नसते.

वीरशैवांचा शिव म्हणजे उपनिषदांत वर्णिलेले परब्रह्म. प्राचीन काळापासून शिवाची उपासना लिंगरूपातच केली जाते. मग ते शिवालयातील स्थावरलिंग असो की शिवभक्ताच्या कंठातील इष्टलिंग असो. निर्गुण, निराकार शिव हा लिंगस्वरूपातच पूजिला गेला. अन्य देवतांप्रमाणे त्याच्या प्रतिमा निर्माण झाल्या नाहीत. शरीरावर लिंगधारणेची प्रथा प्राचीन आहे. शरीरावर लिंगधारण हे शरीरात शिव आहे याचे दर्शक आहे. लिंगधारक दुर्मार्गाकडे वळत नाही, कारण आपल्या देहावर देव आहे अशी धगधगती जाणीव त्याच्या मनात असते. भक्त कोठेही गेला तरी त्याच्यासोबत देव असतो. त्यासाठी त्याला देवघरात, मंदिरात मुद्दाम जाण्याची गरज नसते. लिंगपूजा निरंतर व्हावी, ती चुकू नये ही भूमिका यामागे आहे.

ज्याची निरंतर पूजा केली जाते, जे इष्टार्थ देते आणि अनिष्टांचे निवारण करते त्याला 'इष्टलिंग' असे म्हणतात. नर्मदेतील बाणलिंग, स्फटिकलिंग अथवा शिळेपासून पंचसूत्राने निर्मिलेले शैलजलिंग यांपैकी कोणतेही लिंग इष्टलिंगासाठी निवडता येते. परंतु ते गुरुकडून दीक्षा घेऊनच धारण करायला हवे. बाजारातून लिंग विकत आणून गळ्यात बांधले तर ते इष्टलिंग नव्हे. एखाद्या मुलीने मंगळसूत्र स्वत:च्याच हाताने गळ्यात घालून घेतले तर ती 'पत्नी' होत नाही. त्यासाठी विवाहसंस्कार होऊन वरानेच तिच्या गळ्यात मंगळसूत्र घालावे लागते. तसा गुरुकडून दीक्षासंस्कार झाल्यावर त्याच्याकडून मंत्रपूर्वक स्वीकारलेले लिंग हे 'इष्टलिंग' होते.

इष्टलिंग हृदयातील अंगुष्ठमात्र आत्मज्योतीचे प्रतीक आहे. ते विश्वाकार आहे. त्याच्यावर प्रेम करणे म्हणजे अवघ्या विश्वावर प्रेम करणे. एकदा इष्टलिंग धारण केले तर ते देहावरून कधीही वेगळे काढू नये. मंदिरात मूर्तीची अथवा शिवलिंगाची प्रतिष्ठापना केल्यानंतर त्याचे उच्चाटन करता येत नसते. तसे इष्टलिंग हे देह असेपर्यंत देहावर असतेच, परंतु मृत्यूनंतरही ते देहासोबत भूगर्भात जाते. लिंगधारणेनंतर जर देहाचा आणि लिंगाचा वियोग झाला तर शिवभक्ताने प्राणत्याग करावा असा शास्त्रार्थ आहे. लिंगावाचून जिवंत राहणे हे प्रेतासारखे जिणे आहे. मन्मथस्वामी 'परमरहस्या'त म्हणतात :

जयाचा प्राण लिंगी भरला। तो कैसा असे देही उरला।
लिंग गेलिया देही संचरला। पिशाचवत् जाणिजे॥

लिंग आणि प्राण यांचा असा संयोग असतो.

लिंग अवधानपूर्वक धारण केले पाहिजे. लिंगधारण सगळेच करतात, परंतु त्याचे अवधान फारच थोड्यांना असते. आपल्या शरीरावर लिंग आहे, आपल्या हातून घडणाऱ्या सर्व कृत्यांना शिव साक्षिभूत आहे ही जाणीव म्हणजे अवधान. आचार्यांनी म्हटले आहे :

धारयेदवधानेन शरीरे सर्वदा बुधः ॥६-५१॥

बुध्दिमान लोक सदोदित शरीरावर अवधानपूर्वक लिंगधारण करतात.

एक मनुष्य आपला चष्मा शोधत बसला होता. त्याने अनेक ठिकाणी, घरभर हुडकले. पण त्याला तो सापडला नाही. शेवटी हताश होऊन तो खुर्चीवर बसला. काही वेळाने त्याचा मित्र आला आणि त्याच्या चेहऱ्यावरचा थकवा पाहून म्हणाला,

'तू एवढा थकला कशाने ? कशाची चिंता करतोस ?'

'काय सांगू, अरे दिवसभर शोधून देखील माझा चष्मा सापडला नाही. कुठे ठेवलाय देव जाणे !' तो म्हणाला.

'अरे, तो काय तुझ्या डोळ्यांवरच तर आहे ! मित्र हसून उद्‌गारला.

असे अवधान शून्य असेल तर गळ्यात लिंग बांधून काय उपयोग? बांधले न बांधले सारखेच.

उपासनेचे दोन प्रकार आहेत. प्रतीकोपासना आणि अहंग्रोपासना. ईश्वर आणि आपण वेगळे आहोत अशा भावनेने केली जाणारी मूर्ती, शिवलिंग यांची उपासना ही प्रतीकोपासना तर ईश्वर आणि आपण एकच आहोत या अद्वैतभावाने केलेली उपासना ही अहंग्रोपासना आहे. इष्टलिंगपूजा दिवसातून सहा, तीन, दोन किंवा किमान एकवेळ तरी करावी. त्यात खंड नसावा. तळहातावर इष्टलिंग ठेवून शिवभक्त आपल्या बहिर्मुख वृत्तीला आत वळवतो, अंतर्मुख करतो. इष्टलिंगाच्या ठिकाणी आत्मज्योतीला पाहतो.

इष्टलिंगपूजा करता करता साधक अंतर्मुख झाला की प्राणलिंगाची उपासना करू लागतो. आपल्या शरीरातील प्राणशक्तिविशिष्ट ज्योत हेच प्राणलिंग आहे. त्याची अर्चना क्षमा(जल), नित्यानित्यवस्तुविवेक(वस्त्र), सत्यवचन (आभूषण), वैराग्य (पुष्पमाला), समाधी (गंधसमर्पण), निरंहकारभाव (अक्षता), दृढश्रध्दा (धूप), आत्मज्ञान (दीप), भ्रांतिनिवृत्ती (नैवेद्य), मौन

(घंटानाद), विषयसमर्पण (तांबूल), भेदबुद्धिनिवृत्ती (प्रदक्षिणा), अभेदचिंतन वृत्तीचा विलय (नमस्कार) अशा रीतीने करावी. अशी प्राणलिंगार्चना करणारा साधक अधिक अंतर्मुख होतो. आणि भावलिंगाचे पूजन करू लागतो. 'शिवोऽहम्' – मी शिवच आहे, अशा शुध्द भावनेने आत्मस्वरूपाचे अखंड चिंतन हीच भावलिंगार्चना. इष्टलिंग हे आत्मस्वरूपाचे सद्रूप, प्राणलिंग हे चित्रूप आणि भावलिंग हे आनंदरूप आहे. या ठिकाणी साधक पोहोचला तर त्याला प्राप्त करण्याजोगे आणखी काही उरत नाही. 'शिवोऽहम्' या नादाने त्याचे सबंध शरीर कोंदून जाते आणि तो एक चालते बोलते शिवालय होतो.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# स्नानांत स्नान भस्मस्नान

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भस्म शिवाला अत्यंत प्रिय आहे. तो सर्वांगी भस्मलेपन करतो. म्हणून त्याला 'कर्पूरगौर' असे नाव आहे. भस्मरहित भाळ आणि शिवालय नसलेले गाव यांचा आचार्यांनी धिक्कार केला आहे.

धिग् भस्मरहितं भालं धिग् ग्रामं अशिवालयम्।

ज्या कपाळावर भस्म नाही आणि ज्या गावात शिवालय नाही त्यांचा धिक्कार असो, असे ते म्हणतात. गोमयनिर्मित विभूतीला 'भस्म' असे नाव आहे.

जलस्नानाने शरीर शुद्ध होते. ज्या शरीराची नवद्वारे सतत वाहती असतात त्याच्या शुद्धीसाठी जलस्नानाची आवश्यकता आहे. स्नानात श्रद्धा ओतली की स्नान अर्थपूर्ण होते. ज्याच्या मनात श्रद्धा जागी होत नाही तो गंगेत न्हाला काय आणि न न्हाला काय सारखेच. पशुपक्षीही गंगास्नान करतात. परंतु माणूस 'जय गंगामैया' असा घोष करीत गंगास्नान करतो त्याला काही अर्थ आहे. वीरशैवाचार्यांनी तर 'भस्मस्नान' सांगून 'स्नाना'ला अधिक अर्थपूर्ण, अर्थसुंदर बनविले.

जलस्नानानंतर सर्वांगाला मंत्रपूर्वक भस्मलेपन करणे हेच भस्मस्नान आहे. जलस्नान सर्वच लोक करतात. परंतु शास्त्रात भौमस्नान, आग्नेयस्नान, वायव्यस्नान, दिव्यस्नान, वारुणस्नान आणि मानसस्नान अशी सप्तस्नाने सांगितली आहेत. 'आपोहिष्ठा' इत्यादी वैदिक मंत्रांचे पठण करीत मस्तकावर जलप्रोक्षण करून घेणे याला 'मांत्रस्नान' म्हणतात. गंगा-यमुना इत्यादी पवित्र नद्यांतील मातीचा तिलक कपाळावर लावणे हे 'भौमस्नान' होय. भस्मस्नानालाच 'आग्नेयस्नान' असे नावं आहे. अग्नीमध्ये सर्व वस्तूंचे दहन करण्याची शक्ती असते त्याप्रमाणे भस्मात सर्व शारीरिक आणि मानसिक दोष दूर करण्याचे सामर्थ्य असते. म्हणून हे आग्नेयस्नान. सायंकाळी

गायींच्या पावलांमुळे उडालेली धूळ ज्या वायूत असते अशा वायूचा अंगाला स्पर्श झाला तर ते 'वायव्यस्नान' होय. सकाळी अथवा सायंकाळी उन्हात पडणाऱ्या पावसातील स्नान हे 'दिव्यस्नान' आहे. हे आरोग्यदायक असते. वाहत्या नदीत अथवा तलावात अवगाहन करून केलेले स्नान हे 'वारुणस्नान' होय. निरंतर परमात्म्याचे चिंतन करणे यालाच 'मानसस्नान' म्हणतात. अशा सप्तविध स्नानांत भस्मस्नान सर्वश्रेष्ठ आहे. कारण मांत्र, भौम, वायव्य, दिव्य, वारुण या स्नानांमुळे केवळ बाह्यमलांचा परिहार होतो. तर मानसस्नानामुळे आंतरिक मल नाहीसे होतात. परंतु भस्मस्नानाने मात्र बाह्य आणि आंतरिक दोन्ही मलांचा नाश होत असल्यामुळे ते सर्वश्रेष्ठ मानले जाते :

भस्मना विहितं स्नानमिदमाग्नेयमुत्तमम्।
स्नानेषु वारुणाद्येषु मुख्यमेतन्मलापहम्॥७-२३॥

भस्म हे गोमयापासून म्हणजे गायीच्या शेणापासून निर्मिले जाते. भारतीय संस्कृतीत गायीला अत्यंत पूज्य मानतात. तिला 'गोमाता' म्हणतात. स्त्री स्वतःच्या बाळालाच काही काळपर्यंत दुग्धपान करविते, म्हणून तिला 'माता' म्हणतात. तर जी सर्वकाळ सर्व आबालवृद्धांना पुष्टिवर्धक दूध देते अशा गायीला गोमाता का म्हणू नये? सर्वांसाठी दूध देणारी, शेतासाठी खत देणारी गाय ही शिवाप्रमाणे पूज्य आहे. म्हणून तिचे रक्षण केले पाहिजे. भारतीय मनुष्य केवळ एक 'पशू' म्हणून गायीकडे पाहत नाही तर गोमाता म्हणून पाहतो. प्राचीन काळात गायीला 'गोधन' असे म्हणत. कागदाच्या क्षुद्र तुकड्यांना 'धन' म्हणायचा करंटेपणा त्या काळात नव्हता. कागदी नोटा मानवनिर्मित आहेत. परंतु गोधन मात्र ईश्वरनिर्मित आहे. हे धन जिवंत, रसरशीत आणि लळा लावणारे आहे. कागदी धनाचा कुणाला लळा लागतो? कृषिप्रधान देशात गायीला 'धन' आणि 'माता' मानायलाच हवे. गायीच्या देहात सर्व देवतांचा निवास असतो आणि गोमयात लक्ष्मीचा निवास असतो, असे महाभारतात म्हटले आहे. दीक्षासंस्काराच्या वेळी शरीर शुद्ध व्हावे यासाठी 'पंचगव्य' प्राशन करतात. गोमय, गोमूत्र, गोक्षीर(दूध), गोदधी(दही) आणि गोघृत(तूप) याला पंचगव्य म्हणतात. भारतीय जीवनात गायीला अशी पूज्यता लाभलेली आहे.

पूजनीय अशा गायीच्या गोमयापासून जे भस्म निर्मिले जाते त्याला 'सोपाधिक भस्म' असे म्हणतात. गोमय आणि अग्नी या उपाधी आहेत. म्हणून त्यापासून उत्पन्न झालेले भस्म सोपाधिक होय. शिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान या पंचमुखांतून नंदा, भद्रा, सुरभी, सुशीला आणि सुमना अशा पाच गायी उत्पन्न झाल्या. त्या गायींच्या गोमयांपासून जे भस्म निर्माण झाले त्याला अनुक्रमे विभूती, भसित, भस्म, क्षार आणि रक्षा अशी नावे आहेत. 'विभूती' ही भूती म्हणजे ऐश्वर्य देणारी असल्याने तिला विभूती म्हणतात. (विभूतिर्भूतिहेतुत्वात्). 'भसित्' धारण करणाऱ्या साधकाला सर्वत्र परशिवाचा भास होऊ लागतो. म्हणून तिला भसित् म्हणतात (भसितं तत्त्वभासनात्). 'भस्म' धारण केल्याने सर्व पापे जळून जातात म्हणून त्याला भस्म म्हणतात (पापानां भर्त्सनाद् भस्म). 'क्षार' धारण करणाऱ्या साधकाच्या सर्व आपत्तींचा क्षय होतो म्हणून त्याला क्षार म्हणतात (क्षरणात् क्षारमापदाम्) आणि 'रक्षा' धारण करणाऱ्या साधकाचे भूतप्रेतादींपासून रक्षण होते म्हणून ती रक्षा होय (रक्षणात् सर्वभूतेभ्यो रक्षेति परिगीयते). या पाचपैकी कोणतेही एक भस्म गुरू अथवा जंगम यांच्या पादोदकाने शुद्ध होते. तेव्हा ते 'क्रियाभस्म' म्हटले जाते. हे क्रियाभस्म शास्त्रोक्त विधीने धारण केले पाहिजे. भस्मस्नान, भस्मोद्धूलन आणि त्रिपुंड्रधारण असे भस्मधारण त्रिविध आहे.

जलस्नानानंतर अंग स्वच्छ पुसून घ्यावे. कल्पादी प्रक्रियेपासून निर्मिलेले भस्म आपल्या डाव्या तळहातावर ठेवून ते उजव्या हाताने झाकावे. दोन्ही हात तसेच उजव्या मांडीवर ठेवावे. मौनधारण करून आठवेळा पंचाक्षर मंत्रजप करीत ते अभिमंत्रित करावे. नंतर सर्वांगावर त्याचे सिंचन करून घ्यावे. हेच 'भस्मस्नान' होय. हे स्नान तीन प्रकारांनी करता येते. मस्तकापासून पायापर्यंत भस्मसिंचन करणे, पायापासून मस्तकापर्यंत भस्मसिंचन करणे आणि हृदयापासून मस्तकापर्यंत भस्मसिंचन व हृदयापासून पायापर्यंत भस्मसिंचन करणे. भस्मस्नान करताना ईशान मंत्राने मस्तकावर, तत्पुरुष मंत्राने मुखावर, अघोर मंत्राने हृदयावर, वामदेव मंत्राने गुह्यस्थानावर, सद्योजात मंत्राने दोन्ही पायांवर आणि ॐकार मंत्राने सर्वांगावर भस्मसिंचन करावे. भस्माचा एकही कण भूमीवर पडू नये एवढे अवधान ठेवावे. भस्म हे पूजनीय आहे त्याचा अनादर होऊ नये.

भस्मस्नानाच्या वेळी शरीरावर पडलेल्या भस्मकणांचे सर्वांगावर लेपन

करून घेणे याला भस्मोद्धूलन म्हणतात. भस्मस्नानानंतर भस्मोद्धूलन अवश्य करावे. कल्प, अनुकल्प, उपकल्प व अकल्प अशा भस्म तयार करण्याच्या चार पध्दती आहेत. गायीचे गोमय भूमीवर पडण्यापूर्वीच ते मंत्रपूर्वक गोळा करून, वाळवून, जाळून त्याचा बिल्वपात्रात संचय केला जातो. हीच 'कल्पप्रक्रिया' होय. भस्मनिर्मितीचा हा विधी सर्वश्रेष्ठ असून हे कल्पभस्म सर्वांत अधिक फलदायी आहे. आयुर्वेदातील औषध शास्त्रोक्त पद्धतीने घरी तयार केले तर ते जसे अधिक प्रभावी होते तसे कारखान्यात तयार झालेले होत नाही. त्याप्रमाणे हे कल्पपद्धतीने तयार केलेले भस्म सर्वश्रेष्ठ मानले जाते. अरण्यात पडलेल्या शुष्क गोमयापासून भस्म तयार करण्याच्या विधीला 'अनुकल्प प्रक्रिया' म्हणतात. दुकानात मिळणारे भस्म वस्त्रगाळ करून त्यात गोमूत्र मिसळून वाळल्यानंतर पुन्हा जाळून तयार करण्याची पध्दती 'उपकल्प प्रक्रिया' होय. या तिन्ही शिवाय भस्मनिर्मितीच्या अन्य विधीला 'अकल्पप्रक्रिया' म्हणतात.

आयुर्वेदात गोमूत्र आणि गोमय यांमुळे अनेक रोगांचे निवारण होते असे म्हटले आहे. सर्पदंश, व्रण, बालग्रहपीडा, जंत, देवी अशा अनेक रोगांवर भस्मोपचार सांगितला आहे. भस्मस्नान हे आरोग्यदायक आहे. त्यामुळे शारीरिक स्वास्थ्यलाभ तर होतोच त्याबरोबरच अंत:करण परिशुद्ध होऊन मनुष्य विकारांपासून मुक्त होतो. म्हणून प्रत्येक साधकाने विधिपूर्वक भस्मस्नान करून आपल्या जीवनात आनंद भरून घ्यावा.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# 'भाळी भस्मरेखा'

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भस्म हे परिपक्वतेचे आणि परिपूर्णतेचे लक्षण आहे. जुन्या काळात ज्या भांड्यात अन्न शिजवत त्या भांड्याला भस्म लावण्याची प्रथा होती. अन्न हे परब्रह्म आहे (अन्नं ब्रह्मेति व्यजानीयात्). ही खूण जशी त्या प्रथेमुळे पटायची तसेच त्या भांड्याचे पावित्र्यदेखील मनावर ठसायचे. सर्वांगी भस्मधारण केलेला आणि मस्तकावर ठसठशीत त्रिपुंड्र लावलेला शिवभक्त पाहिला की आपलेही मन आनंदाने उचंबळून येते. शिवभक्ताचे अंत:करण परिपक्व आणि आनंदभरित असते. मन्मथस्वामींनी तर अशा शिवभक्ताला भूलोकीचा ईश्वर म्हटले आहे:

भाळी भस्म लिंग गळा। शोभे रुद्राक्षांच्या माळा॥
त्याचे झालिया दर्शन। पापी उध्दरती जन॥
मन्मथ म्हणे हे खरे। भू-ईश्वर अवतरे॥

आजच्या काळात रासायनिक सौंदर्यप्रसाधनांचा फार सुळसुळाट झाला आहे. आपला चेहरा गोरा दिसावा म्हणून अनेक स्त्री-पुरुष पावडरचा मुक्तहस्ताने उपयोग करतात. पावडरमुळे क्षणकाल गौरवर्णाचा आभास होत असला तरी त्वचेवर त्याचा अनिष्ट परिणाम होतो. म्हणून पावडर लावून गोरे होण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा भस्म लावून गौर होणे केव्हाही चांगले. त्यामुळे बहिरंग गोरे दिसेल आणि अंतरंग देखील निर्मळ होईल. पावडर लावणे आणि भस्म लावणे यांमुळे आपल्या भावविश्वात केवढे तरी अंतर पडते. पावडर लावली तर वैषयिक भावना मनात जागी होते आणि भस्म लावले तर पावित्र्यभावना जागी होते. ज्याला पावित्र्याशी मैत्री करायची असेल त्याने भस्म लावावे. ज्याला केवळ 'फ्रेश' व्हायचे असेल त्याने पावडरच्या नादी लागावे.

अन्नाचा सूक्ष्म परिणाम म्हणजे मन. ज्या प्रकारचे अन्नसेवन केले

जाते त्याप्रकारचे मन बनते. राजस आहारामुळे रजोगुणी, तामस आहारामुळे तमोगुणी तर सात्त्विक आहारामुळे सत्त्वगुणी प्रवृत्ती मनात निर्माण होते. सात्त्विक मनातच आत्मविषयक ज्ञान उत्पन्न होते, असे भगवद्गीतेत म्हटले आहे. सात्त्विक प्रवृत्ती उत्पन्न होण्यासाठी केवळ सात्त्विक आहारच नव्हे तर सान्त्विक वेषभूषा देखील आवश्यक असते. सात्त्विक आहार घेणाऱ्याने राजस वेषभूषा केली तर त्या वेषभूषेचा मनावर निश्चितच काहीतरी परिणाम होईल. म्हणून सात्त्विक आहाराबरोबरच त्याला पोषक असा साधा पोशाख साधकाने घालावा. वेषाप्रमाणे अलंकारही महत्वाचे असतात. भस्म, गंध, रुद्राक्ष हे धार्मिक आणि सात्त्विक अलंकारच होत. याशिवाय अन्य आभूषणे राजस आहेत. सात्त्विक अलंकार धारण केले तर सत्त्वगुणाचा प्रकर्ष होतो. सात्त्विक वृत्ती मन:शांतीला कारणीभूत होते, उत्तम विचारांना पोषक होते. साध्या राहणीत उच्च विचारांची जोपासना करणे यासारखे चांगले कर्म दुसरे नाही.

भस्म हे सात्त्विक आभूषणच आहे. सात्त्विक आहार, सात्त्विक वेष आणि भस्मधारण ही शिवभक्ताची वैशिष्ट्ये आहेत. भस्मस्नानानंतर भस्मोद्धूलन करून त्रिपुंड्र धारण करावे, असे 'सिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. त्रिपुंड्रधारण नित्य केले पाहिजे.

त्रिपुंड्रं धारयेन्नित्यं भस्मना सलिलेनच।
स्थानेषु पंचदशसु शरीरे साधकोत्तम: ।।७-३१।।

श्रेष्ठ साधकाने जलमिश्रित भस्माने शरीराच्या पंधरा स्थानांवर त्रिपुंड्र नित्य धारण करावे, असा या श्लोकाचा अर्थ आहे. ही पंधरा स्थाने कोणती? ती देखील आचार्यांनी नि:संदिग्धपणे सांगितली आहेत. मस्तक, कपाळ, दोन्ही कान, कंठ, दोन्ही भुजा, हृदय, नाभी, पाठ, दोन्ही दंड, मान, दोन्ही मनगटे अशी ही पंधरा स्थाने होत. निष्ठेने भस्मधारण केल्यावर शिवंकर अशा शिवाची प्राप्ती होते:

शिवं शिवकरं शांतं स प्राप्नोति न संशय:।

कळत अथवा नकळत त्रिपुंड्रधारण केल्याने दुराचारी लोकांची पापे

नष्ट होऊन त्यांना शिवलोक प्राप्त झाला, अशा आशयाच्या अनेक कथा शैवपुराणांत विखुरलेल्या आहेत. एक व्याध शिकारीसाठी अरण्यात गेला. तेथे एका झाडाखाली बसला असता त्याचा अचानक मृत्यू झाला. त्याच्या सोबत असलेल्या कुत्र्याने त्याला जागे करण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी कुत्र्याच्या पावलांना लागलेले चिताभस्म व्याधाच्या कपाळावर नकळत लागले. मृत्यूनंतर प्रेताच्या कपाळावर चिताभस्म लागले एवढ्या पुण्यसंचयामुळे व्याधाच्या आत्म्याला शिवलोक प्राप्त झाला.

त्रिपुंड्रधारण हे सर्वश्रेष्ठ आहे. त्रिपुंड्रातील तीन रेखा ब्रह्मा, विष्णू, महेश यांची प्रतीके आहेत, असे चंद्रज्ञानागमात सांगितले आहे. ब्रह्मा, विष्णू अथवा महेश यांपैकी कोणत्याही देवाची उपासना करणाऱ्या भक्ताने त्रिपुंड्र धारण केला पाहिजे. त्रिपुंड्रधारणात दोन प्रकार असून 'ऊर्ध्व त्रिपुंड्र' म्हणजे उभा त्रिपुंड्र वैष्णव धारण करतात. तर 'तिर्यक् त्रिपुंड्र' म्हणजे आडवा त्रिपुंड्र शैव आणि वीरशैव धारण करतात. मनुष्याच्या कपाळाची ठेवण उभी किंवा वर्तुळाकार नाही, तर ती आडवी आहे. कपाळावरील रेषा म्हणजे आठ्या आडव्याच असतात. त्यामुळे त्यावर तिर्यक् त्रिपुंड्र धारण करणे हेच स्वाभाविक आणि योग्य आहे. त्रिपुंड्रधारण न करता केलेले ध्यान, जप, दान इत्यादी व्यर्थ होय असे धर्मशास्त्रात म्हटले आहे.

त्रिपुंड्रधारणाच्या दोन पध्दती आहेत. तर्जनी, मध्यमा आणि अनामिका या मधल्या तीन बोटांनी डावीकडून उजवीकडे कपाळभर त्रिपुंड्र लावणे ही एक पध्दत आहे. मध्यमा आणि अनामिका दोन बोटांनी प्रथम डावीकडून उजवीकडे, नंतर अंगठ्याने दोन रेषांच्या मध्ये उजवीकडून डावीकडे असा त्रिपुंड्र लावणे ही दुसरी पद्धत आहे. हिला 'अनुलोम-विलोम पद्धती' म्हणतात. त्रिपुंड्राच्या रेखा अत्यंत सरळ, शुभ्र, एकमेकींना स्पर्श न करणाऱ्या, अखंड आणि ठळक असाव्या. त्रिपुंड्रधारण हे एक व्रत असून त्याला 'शांभव व्रत' म्हटले जाते. वीरशैवांच्या इष्टलिंगपूजेचे ते एक अंग असल्यामुळे वीरशैवांसाठी त्रिपुंड्रधारण हे जीवनव्रत आहे. त्रिपुंड्रधारण करणारा हा प्रत्यक्ष रुद्रच होय :

स रुद्रो नात्र संशय: ॥७-३७॥

तो रुद्राप्रमाणे सर्व लोकांना पूज्य होतो. त्रिपुंड्राची अथवा त्रिपुंड्रधारकाची निंदा करणे म्हणजे प्रत्यक्ष शिवाची निंदा करणे. म्हणून भक्त कोणाचाही असो त्याने धारण केलेल्या भस्म, गंध इत्यादी चिन्हांची निंदा करु नये. प्रतिदिनी नित्यनियमाने वीरशैवांनी त्रिपुंडधारण करावे. ज्याला त्रिपुंड्राचा अर्थ उमगतो तो शिवकृपेला पात्र होतो आणि जो नित्य त्रिपुंड्रधारण करतो तो प्रत्यक्ष. शिवच असतो. म्हणूनच मन्मथस्वामींनी म्हटले आहे.

भाळी भस्मरेखा । तुम्ही तयासी ओळखा ॥

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# चिंतामुक्त जीवन

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मानवी जीवन अशांतीने भरलेले, चिंतेने ग्रासलेले आहे. आपल्या अवती भवती अशांतीचे थैमान चालू आहे. राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, धार्मिक अशा सर्व क्षेत्रांत चिंताच करावी अशा घटना घडत आहेत. कधी कधी अनावश्यक चिंतन करून आपण स्वतःच चिंतेला आमंत्रण देतो. अंथरुण पाहून आपण पाय पसरत नाही. आपले जीवन अवडंबराने भरलेले आहे. हे हवे, ते हवे. ते घेण्यासाठी पैसा हवा. तो सचोटीने मिळत नाही म्हणून लांडीलबाडी करावी. आणि आपणच निर्मिलेल्या जाळ्यात आपण गुंतत जावे. हे आजच्या सर्वसामान्य मध्यमवर्गीय माणसाच्या जीवनाचे चित्र आहे. एका कवीने उपरोधाने म्हटले आहे :

पैसा मेरा परमात्मा। पत्नी मेरा गुरु।
बालबच्चे साधुसंत। सेवा किस की करूँ ?॥

ज्याची दृष्टी केवळ पैशाभोवतीच घुटमळते त्याची अशी अवस्था होणारच. ही चिंता आपण स्वतः ओढवून घेतली आहे. चिंता आणि चिता या दोन्ही जाळणाऱ्या गोष्टी आहेत. चिता निर्जीवाला जाळते तर चिंता सजीवाला जाळते, आयुष्यभर जाळत राहते. चिंतेमुळेच शारीरिक आणि मानसिक रोग उत्पन्न होतात. आयुष्यातील ऐंशी टक्के रोगांचे कारण चिंता हे असते. देह रोगांचे खाद्य, भातके असते, असे मन्मथस्वामी म्हणतात :

देह नव्हे, साच रोगाचे भातुक।
अंतरी विवेक करुनि पाही॥

शरीर आणि मन रोगट करणारी चिंता अशी आयुष्य व्यापून राहते.

माणूस असा चिंतेने ग्रासलेला तर परशिव कसा निश्चिंत, शांत! शिवपरिवार मोठा विषम आहे. शिव स्वतः नंदीवर स्वार झालेला तर

त्याची पत्नी भवानी ही सिंहावर स्वार झालेली. सिंहाचे लक्ष नंदीवर आहे, कारण नंदी त्याचे खाद्य. शिवाचे केव्हा दुर्लक्ष होते आणि आपण नंदीच्या नरडीचा घोट घेतो असे त्याला झालेले. शिवाच्या पुत्रांचे षडाननाचे वाहन मयूर तर गणपतीचे वाहन उंदीर. शिवाचा गळा सापांनी वेष्टिलेला. सापाचे लक्ष उंदरावर तर मोराचे लक्ष सापावर. स्वत: भवानी शिवाच्या जटेत बसलेल्या गंगेवर नजर ठेवून आहे. कारण तिला ती सवतीसारखी भासते. एवढ्या विषम परिवारात देखील शिव किती शांतवृत्तीने बसलेले आहेत !

शिवं शिवकरं शांतम्।

अशा शांतस्वरूप शिवाचे चिंतन केल्यावर आपल्या मनातली अशांती दूर पळून जाणार नाही तर काय? शांत वस्तूच्या चिंतनामुळे शांती मिळते, अशांत वस्तूच्या चिंतनामुळे मिळणे शक्य नाही. प्रपंच अशांत आहे. त्याच्या चिंतनाने अशांतीच लाभणार. म्हणून दिवस-रात्रीच्या चोवीस तासांपैकी तेवीस तास प्रपंचाचे चिंतन केले तर एक तास शिवचिंतन करायला काय हरकत आहे? सर्व प्रकारच्या भानगडी करायला आपल्याला वेळ मिळतो. पण शिवचिंतनासाठी मात्र मिळत नाही. म्हणूनच चिंता सारखी आपल्या पाठीमागे लागलेली असते. ती आपल्याला सळो की पळो करून सोडते.

एक व्यापारी राजाकडे एक अमूल्य रत्न घेऊन गेला. ते तेजस्वी रत्न पाहून राजा चकित झाला. व्यापारी म्हणाला,

'महाराज, आपण रत्नाची नीट पारख करून मला त्याचे योग्य दाम द्या.'

परंतु राजाला त्या रत्नाची किंमत करता येईना. म्हणून त्याने दवंडी पिटून जो कोणी रत्नाचे योग्य मूल्यमापन करील त्याला मोठे बक्षीस दिले जाईल असे जाहीर केले. भलेभले रत्नपारखी आले. परंतु त्यांनाही रत्नाचे मोल करता येईना. अखेर एक म्हातारा राजाकडे येऊन म्हणाला,

'मी एक रत्नपरीक्षक आहे आण बघू तुझे रत्न, एका क्षणात त्याचे मोल सांगतो !'

राजाला विश्वास वाटेना. तरीही त्याने म्हाताऱ्याच्या हाती रत्न

दिले. म्हाताऱ्याने डोळ्यांजवळ नेऊन ते काळजीपूर्वक पाहिले आणि सांगितले,

'या रत्नाचे दाम एक लक्ष सुवर्णमुद्रा!'

राजा थक्क झाला. त्याने विचारले, 'या रत्नाची किंमत एवढी कशी?'

'महाराज,' म्हातारा उत्तरला, 'हे साधे रत्न नाही. अंधारात ठेवले तर याचा प्रकाश पडतो आणि जवळ बाळगले तर चिंता दूर होतात!

राजाने व्यापाऱ्याला एक लक्ष सुवर्णमुद्रा देऊन रत्न विकत घेतले आणि म्हाताऱ्याला विचारले,

'सांग तुला काय बक्षीस देऊ?'

म्हातारा म्हणाला, 'ते मी काय सांगू? तू ठरव.'

राजाला या विलक्षण रत्नपारख्याला काय बक्षीस द्यावे ते ठरवता येईना. म्हणून त्याने पुन्हा दवंडी पिटली.

दवंडी ऐकून एक महात्मा राजाकडे येऊन म्हणाला,

'मी या रत्नपारख्याला काय बक्षीस द्यायचे ते सांगतो!'

राजाने होकार दर्शविताच तो म्हाताऱ्याकडे वळून म्हणाला,

'किती वय आहे तुमचे?'

'ऐंशी.' म्हातारा उत्तरला.

'कधीपासून रत्नांची पारख करता?'

'वयाच्या दहाव्या वर्षापासून.'

'आजवर बाह्य रत्नांची पारख केली तशी कधी अंतरंगातल्या रत्नाची पारख केली काय?'

म्हाताऱ्याला उत्तर सुचेना, महात्म्याने विचारले,

'तुमच्या अंतरंगात एक रत्न आहे ते तरी माहीत आहे का?'

'नाही.'

'नाही?' महात्मा राजाकडे वळून म्हणाला , 'महाराज याला विवस्त्र करून यांच्या अंगावर हजार कोरडे मारा. हेच याचे बक्षीस, ऐंशी वर्षाचा झाला तरी अजून याला अंतरंगातल्या रत्नाची जाणीव देखील नाही.'

अंतरंगातले रत्न ज्याला ओळखता येते आणि जो त्याचे चिंतन करतो तोच चिंतामुक्त होतो.

'सिद्धांतशिखामणी'त बाह्य आणि अंतरंग असे भस्मधारणाचे दोन

प्रकार सांगितले आहेत. यालाच सोपाधिक आणि निरुपाधिक भस्मधारण असेही म्हणतात. गोमयनिर्मित भस्मधारण हे बाह्य भस्मधारण तर परशिवाचे सतत चिंतन करणे हे अंतरंग भस्मधारण होय.

महाभस्मेति संचित्य महादेवं प्रभामयम्।
वर्तन्ते ये महाभागा मुख्यास्ते भस्मधारिण: ॥७-२॥

प्रकाशमान महादेव हा महाभस्म असून त्याचे अंतरंगात चिंतन करणे हे मुख्य भस्मधारण आहे. यालाच निरुपाधिक भस्मधारण अथवा अंतरंग भस्मधारण म्हणतात. शिव हा निरुपाधिक आहे. त्याला कोणतीही उपाधी नाही. म्हणून त्याचे चिंतन हे निरुपाधिक भस्मधारण होय. श्रेष्ठ साधक अंतरंग भस्मधारण करतात. या भस्मधारणाने आपले जीवन चिंतामुक्त होते. आपण ज्याचे चिंतन करू त्याप्रमाणे आपली मनोवृत्ती होते. शिवचिंतन म्हणजे शांत वस्तूचे चिंतन. त्याच्या चिंतनाने अपार शांतीचा लाभ होईल. साधकाची दृष्टीच शिवमय झाली तर काळजाला घरे पाडणारी अशांती उरेलच कोठे? शिवचिंतनाने ज्याचे सबंध जीवन व्यापून गेले त्याच्या मनाची आनंदविभोर अवस्था काय वर्णावी?
मन्मथस्वामी त्याचे चित्र उभे करतात:

शिव नाद शिव छंद। वाचे शिव स्मरावा॥
शिव अवघा प्रेमानंद। सदाशिव स्मरावा॥
शिव हृदयी रात्रंदिन। मुखी ध्यान सदाशिव॥
शिव सुखां शिव दु:खा। मन्मथमुखां सदाशिव॥

शिवस्मरणात रंगून गेलेल्या अशा शिवभक्ताला कोठली आलीय चिंता? चिंता अशाचा पाठलाग कशाला करील? तिचे भक्ष्य म्हणजे संसारातील वखवखलेली माणसे. त्यांच्या पाठीच ती कायमची लागलेली. अंतरंग भस्मधारकाच्या वाटेला सुद्धा जाण्याची तिची प्राज्ञा नाही. म्हणून वीरशैवांनी बाह्य भस्म तर धारण करावे पण त्याच्यासोबतच अंतरंगभस्मधारण करून चिंतामुक्त जीवन जगावे.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# ‘शोभे रुद्राक्षांच्या माळा’

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनुष्य हा आभूषणप्रिय आहे. आपले शरीर सुंदर दिसावे यासाठी तो नानाप्रकारचे अलंकार धारण करतो. स्त्रियांची तर या बाबतीत विशेष प्रसिद्धी आहे. त्या कधी कधी एवढे अलंकार धारण करून नटतात की त्यांना अलंकाराचे ओझे कसे होत नाही याचे आपल्याला नवल वाटते. सोने-रूपे या धातूंच्या आभूषणांनी माणूस आपले देखणेपण वाढवतो. परंतु या आभूषणांना चोरांचे भय आहे. आभूषणांमुळे आपल्याला जीवाची भीती आहे. आपल्या अंगावरील सोन्याची आभूषणे पाहून कोणाच्या डोळ्यांत विस्मय दाटतो, कोणाच्या डोळ्यांत मत्सराने अंगार पेटतो तर कोणाच्या डोळ्यांत लालसा जागी होताना दिसते. सुवर्णालंकार हा आपल्या आनंदाचा तर इतरांच्या मत्सराचा विषय असतो.

रुद्राक्ष हे देखील शिवाचे आभूषण आहे. ते शिवाला अत्यंत प्रिय आहे. या आभूषणाला चोराचे भय नाही. जो रुद्राक्ष धारण करतो तो प्रत्यक्ष शिवच असतो.

भस्मोद्धूलितसर्वांगा धृतरुद्राक्षमालिका:।
ये भवन्ति महात्मानस्ते रुद्रा नात्र संशय: ॥७-६५॥

ज्याने सर्वांगावर भस्मोद्धूलन केलेले आहे आणि गळ्यात रुद्राक्षमाळा धारण केल्या आहेत असा महात्मा प्रत्यक्ष रुद्रच आहे यात संशय नाही. रुद्राक्ष हे आभूषण असले तरी सुवर्णालंकाराप्रमाणे केवळ शरीराच्या सजावटीसाठी ते धारण केले जात नाही. त्यात प्रदर्शन नसते. रुद्राक्षधारणाने ‘मी श्रीमंत, मी मोठा’ असा मनात अहंकार निर्माण होत नाही तर ‘सर्व काही शिव आहे’ असा समभाव निर्माण होतो. म्हणून सर्व आभूषणांपेक्षा रुद्राक्ष हे आभूषण श्रेष्ठ आहे.

रुद्राक्षाची निर्मिती शंकराच्या नेत्रांतून झाली अशी कथा आहे.

विशिष्ट वृक्षाच्या बीजाला 'रुद्राक्ष' म्हटले जाते. रुद्राक्ष हे उत्पत्तिभेदाने अडतीस प्रकारचे असतात. रुद्राक्ष एक मुखापासून चौदा मुखापर्यंत असतात. वीरशैवाने शिखास्थानी एकमुखी एक रुद्राक्ष, मस्तकावर द्विमुखी, त्रिमुखी आणि द्वादशमुखी प्रत्येकी एकेक असे तीन रुद्राक्ष, कपाळाभोवती अकरा मुखांचे छत्तीस रुद्राक्ष, दोन्ही कानांवर पाच, सात आणि दहा मुखांचे प्रत्येकी दोन असे सहा रुद्राक्ष, कंठात सहा मुखांचे सोळा आणि आठ मुखांचे सोळा असे बत्तीस रुद्राक्ष, वक्ष:स्थळावर चार मुखांचे पन्नास रुद्राक्ष, दोन्ही दंडावर तेरा मुखांचे सोळा-सोळा रुद्राक्ष, दोन्ही मनगटांवर नऊ मुखांचे बारा-बारा रुद्राक्ष धारण करावे. चौदा मुखांच्या एकशे आठ रुद्राक्षांची माळ यज्ञोपवितAप्रमाणे शिवभक्ताने सदैव गळ्यात धारण करावी. छिद्र न पडलेले, शुध्द वर्णाचे, काटेरी आणि पूर्वी कोणी न वापरलेले रुद्राक्षच धारण करण्यास योग्य होत. जो सर्वकाळ रुद्राक्ष धारण करतो त्याला पापाचा स्पर्श होत नाही आणि रुद्राक्षधारणाने एक कोटी गोदान केल्याचे पुण्य लाभते, असे 'सिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. अधिकाधिक रुद्राक्ष धारण करणे हे अधिक फलदायी असते . परंतु शिवभक्ताने किमान एक तरी रुद्राक्ष अवश्य धारण केला पाहिजे.

'चंद्रज्ञानागमा'त रुद्राक्षधारणाचे फळ सांगितले आंहे. एकमुखी रुद्राक्षधारणाने साधक जितेंद्रिय होतो. द्विमुखी धारण केल्याने अर्धनारीश्वराच्या कृपेला पात्र होतो. त्रिमुखी धारण केल्याने त्याच्यावर अग्निदेवता प्रसन्न होते, चारमुखी धारण केल्याने बह्मदेवाची, पाचमुखी धारण केल्याने सदाशिवाची, सहामुखी धारणाने कार्तिकेयाची, सातमुखी रुद्राक्षधारणाने सप्तमातृकांची, आठमुखी धारणाने अष्टवसूंची, नवमुखी धारणाने दुर्गेची आणि दशमुखी रुद्राक्षधारणाने यमराजाची कृपा होते. अकरामुखी रुद्राक्षधारणाने इंद्रादी देवता संतुष्ट होऊन सौभाग्यवृद्धी होते. बारामुखी धारणाने सूर्याची कृपा लाभते, चौदा मुखांचा रुद्राक्ष धारण केल्याने सर्व रोग नाहीसे होऊन आरोग्यप्राप्ती होते. रुद्राक्षमाला धारण करणे आरोग्यदायक असल्यामुळ केवळ वीरशैवांनीच नव्हे तर सर्वांनीच ती धारण केली पाहिजे.

रुद्राक्षधारणाने रक्तदाब, हृदयविकार इत्यादी रोगांना प्रतिबंध होतो, असे विज्ञानाने सिद्ध केले आहे. म्हणून जगात सर्वत्र अधिकाधिक लोक रुद्राक्षधारण करीत आहेत. रुद्रांची संख्या शंभर आहे. म्हणून रुद्राक्षमाळेत एकशेआठ रुद्राक्ष असतात. हाती माळ घेऊन जप केल्याने शरीराचे चलन-वलन

चालू राहते आणि जागृती येण्यासाठी आपण जप करीत आहोत अशी साधकाची भावना होते. माळेतील रुद्राक्ष जसे सतत फिरत राहतात तशी साधकाला लाभलेली शिवसमदृष्टी एकाच ठिकाणी स्थिर न होता सतत सर्वत्र फिरली पाहिजे. सर्व प्राण्यांमधील, सर्व वस्तूंमधील समत्व साधकाला जाणवले पाहिजे.

रुद्राक्षधारणाने मनुष्याची सर्व पापे नाश पावतात:

रुद्राक्षधारणादेव मुच्यन्ते सर्वपातकैः।
दुष्टचित्ता दुराचारा दुष्प्रज्ञा अपि मानवाः ॥७-४६॥

जे मनाने दुष्ट आहेत, दुराचारी आणि दुष्ट बुद्धीचे आहेत अशा मनुष्यांनी रुद्राक्षधारण केल्याने त्यांची सर्व पापे नाहीशी होतात. 'पातयति इति पातकम्' म्हणजे जीवाला दुर्गतीत पाडणारे जे कर्म तेच पातक होय. पातकाचे अतिपातक, महापातक, अनुपातक, उपपातक, संकरीकरण, अपात्रिकरण, जातिभ्रंशकरण, मलावह आणि प्रकीर्णक असे नऊ प्रकार आहेत. ब्रह्महत्या, मद्यपान, चौर्य, गुरुपत्नीगमन ही चार महापातके आणि या महापातक्यांचा संसर्ग हे पाचवे महापातक अशी पंचमहापातके होत. ही सर्व पातके रुद्राक्षधारणाने नष्ट होतात. एवढेच नव्हे तर मृतदेहावर असलेले रुद्राक्षसुध्दा जीवात्म्यांना फलदायी ठरते. म्हणून वीरशैवांत मृत्यूनंतर मृतदेहावर भस्म, रुद्राक्ष, लिंग ठेवूनच त्याचा अंत्यसंस्कार करतात. भारतीय धर्मपरंपरेत मृत्यूनंतर मनुष्याच्या अस्थी आणि रक्षा यांचे गंगेत विसर्जन करण्याची प्रथा आहे. त्यामुळे जीवात्म्याला सद्गती मिळते असे शास्त्रवचन आहे. त्याचप्रमाणे मृत्यूनंतर प्रेतावर रुद्राक्ष ठेवून अंत्यसंस्कार केला तर तो जीवात्म्याला फलदायी ठरतो. अंत्यसंस्काराचे प्रयोजन जीवात्म्याला सद्गती मिळावी हेच आहे.

रुद्राक्षधारणामुळे जीवात्म्याला शिवलोक मिळाला अशा आशयाच्या अनेक कथा शैवपुराणांत आढळतात. जाणता अथवा अजाणता, रुद्राक्षधारण केले तरी त्याचे फळ मिळते.

रुद्राक्षधारण असे पापनाशक आणि पुण्यदायक आहे. मस्तकावर रुद्राक्ष ठेवून स्नान केले तर गंगास्नानाचे पुण्य मिळते आणि रुद्राक्षप्रक्षालित पाणी प्याल्याने अकाली मृत्यू दूर होतो, असे शास्त्रात म्हटले आहे.

म्हणून वीरशैवांनी रुद्राक्षधारण अवश्य केले पाहिजे. ज्यांच्या कंठात रुद्राक्षमाळा शोभून दिसतात असे चालते बोलते शिवच या जगात मांगल्याची पेरणी करू शकतात.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# शिवसमदृष्टी

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनुष्याच्या ठिकाणी असलेल्या भेदबुद्धीमुळेच विषमता निर्माण झाली. त्यामुळे सर्वत्र अशांतीचे थैमान दिसत आहे. भावा-भावांत, गावा-गावांत समानतेचा सूर दिसत नाही. कारण माणसाची मने अतिशय संकुचित झाली आहेत. निसर्गत: असलेल्या समानतेचा स्वार्थबुद्धीमुळे माणसाला विसर पडला आणि स्वार्थालाच परमार्थ समजण्याची वृत्ती सर्वत्र बळावली. मला समाजाकडून काय मिळते यापेक्षा मी समाजाला काय देतो असा प्रश्न मनुष्याच्या मनात उत्पन्न झाला तरच स्वार्थभावना नाहीशी होऊन त्याची दृष्टी व्यापक आणि सर्वस्पर्शी होईल. अशी समदृष्टी सर्वांच्या ठिकाणी निर्माण झाली तर सर्व समाज सर्वार्थाने सुखी होऊ शकेल.

रुद्राक्ष हे समत्वबुद्धीचे प्रतीक असून त्याच्या धारणात वर्णभेद किंवा जातिभेद नाही. कोणत्याही जातीचा, वर्णाचा अथवा धर्माचा मनुष्य रुद्राक्षधारण करू शकतो. रुद्राक्षधारण ही शिव दृष्टीची साधना आहे, सदाचाराचा संकल्प आहे. रुद्राक्षधारण करणारा साधक शुद्ध जीवनाकडे वाटचाल करू लागतो. सात्त्विक आहार घेणे, सात्त्विक वेषभूषा करणे, काम-क्रोध-मत्सर-लोभ इत्यादी दुष्प्रवृत्तींना दूर ठेवून सदैव शिवचिंतन करण्याचे पथ्य मनुष्याने पाळले तरच त्याला रुद्राक्षधारणाचे फळ मिळते. रुद्राक्षधारण केल्याने दुराचारी मनुष्य सदाचारी बनतो, परंतु रुद्राक्षधारण केल्यानंतर जर दुराचरण केले तर रुद्राक्षधारण निष्फळ ठरते.

रुद्र याचा अर्थ शिव आणि अक्ष याचा अर्थ दृष्टी. 'रुद्राक्ष' म्हणजे शिवदृष्टी. शिवदृष्टी म्हणजे सर्व विश्वात समानता पाहणारी दृष्टी. ती संकुचित असणार नाही. स्वार्थमूलक आणि स्वार्थप्रेरक असणार नाही. वीरशैव-सिद्धान्तात शरीरावर रुद्राक्षधारण करण्याचा जो विधी सांगितला आहे त्याचा खरा उद्देश हाच होय. रुद्राक्षधारणाने साधकाच्या ठिकाणी शिवसमदृष्टी यावी अशी अपेक्षा आहे. म्हणून शरीरावरील रुद्राक्षधारण हे समदृष्टीचे प्रतीक आहे. ज्यांचे चरित्र उदार आहे त्यांना सर्व पृथ्वी

एका कुटुंबासारखी दिसते. ही उदारता रुद्राक्षधारण करणाऱ्या साधकाच्या ठिकाणी निर्माण झाली पाहिजे. मन उदार झाल्याशिवाय शिवत्व प्राप्त होणार नाही.

त्रिपुरासुर-संहाराच्या वेळी त्याची तिन्ही पुरे एकत्र येईपर्यंत शंकर निर्निमेष दृष्टी लावून बसले होते. त्यावेळी त्यांच्या तिन्ही नेत्रांतून अश्रुबिंदू खाली पडले. त्यामधून रुद्राक्षाचा वृक्ष निर्माण झाला अशी रुद्राक्षाच्या उत्पत्तीची कथा 'सिद्धान्तशिखामणी'त वर्णिली आहे. शिवाच्या सूर्यनेत्रातून कपिलवर्णाचे बारा प्रकारचे रुद्राक्ष,चंद्रनेत्रातून शुभ्रवर्णांचे सोळा प्रकारचे रुद्राक्ष आणि अग्निनेत्रातून कृष्णवर्णाचे दहा प्रकारचे रुद्राक्ष उत्पन्न झाले. सूर्याच्या बारा कला, चंद्राच्या सोळा कला तर अग्नीच्या दहा कला असतात. अशी एकूण अडतीस प्रकारच्या रुद्राक्षांची निर्मिती शिवनेत्रांतून झाली. अश्रूत मोठी शक्ती असते. अश्रूचे आनंदाश्रू दुःखाश्रू आणि योगाश्रू असे तीन प्रकार आहेत. शिवाचे अश्रू हे योगाश्रू होते. आनंदाश्रूत ज्याने आनंद दिला त्याचे भले करण्याची शक्ती असते. दुःखाश्रूत ज्याने दुःख दिले त्याचे वाईट करण्याची शक्ती असते. त्याप्रमाणे योगाश्रूत दुष्टांचे पारिपत्य आणि सुष्टांचे रक्षण करण्याची शक्ती असते. जो रुद्राक्षधारण करतो त्याच्या ठिकाणी ही शक्ती निर्माण होते. त्याच्या मनातील दुष्टवृत्तीचा नाश होऊन सुष्टवृत्तीचा प्रकर्ष होतो. आणि 'सर्वे सुखिन: भवन्तु' अशी शिवदृष्टी त्याला लाभते. ही शिवसमदृष्टी सर्वांना लाभली तर विश्वात निश्चित शांती नांदेल.

रुद्राक्षाच्या दर्शनाने, स्पर्शनाने, स्मरणाने किंवा धारण केल्याने प्रपंचातील सर्व लोक पापापासून मुक्त होतात. मग तो ब्राह्मण असो वा अंत्यज, पंडित असो वा मूर्ख :

दर्शनात् स्पर्शनाचैव स्मरणादपि पूजनात्।
रुद्राक्षधारणाल्लोके मुच्यन्ते पातकैर्जना: ॥७-६१॥

भस्म, रुद्राक्ष धारण न करता केलेली नित्य, नैमित्तिक, काम्य इत्यादी सर्व कर्मे निष्फळ होतात. म्हणून वीरशैवांनी रुद्राक्ष हे आभूषणाप्रमाणे धारण करावे. त्याबरोबरच प्राणिमात्रांत, ब्रह्मांडात समत्व पाहणारी शिवसमदृष्टी प्राप्त करून घ्यावी ज्याला हे जमले त्याचे जीवन धन्य होईल यात काय संशय ?

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# 'मुखीं शिवनाम घ्यावे'

जिज्ञासू सद्भक्तांनो,

दीक्षेच्या वेळी श्रीगुरूकडून शिष्याला निर्गुणरूप अशा इष्टदेवतेच्या नावाचा जो गूढ उपदेश केला जातो त्याला 'मंत्र' म्हणतात :

मंत्र्यते = गुप्तं परिभाष्यते इति मंत्र:

ज्याच्या मननाने साधकाचे रक्षण होते तो मंत्र, अशीही मंत्राची एक व्याख्या आहे. वीरशैव-सिद्धान्ताप्रमाणे मंत्र हे गुरू, लिंग, जंगम, पादोदक, प्रसाद, विभूती, रुद्राक्ष आणि मंत्र या अष्टावरणांतील अंतिम आवरण असून ते साधकाचे अभेद्य कवच आहे.

'आव्रियते देहादिकं येन तद् आवरणम्' या व्युत्पतीप्रमाणे देहादी वस्तूंना ज्याने आवृत्त केले जाते म्हणजे झाकले जाते त्याला 'आवरण' असे म्हणतात. झाकणे, लपवणे, कुंपण घालणे इत्यादी 'आवरण' शब्दाचे अनेक अर्थ आहेत. आवरणाचे दोन उद्देश असतात. कोणत्याही वस्तूचे वास्तविक रूप प्रकट होऊ न देणे आणि सर्वप्रकारच्या विनाशकारी शक्तींपासून रक्षण करणे. वस्त्रे मनुष्याची नग्नता झाकून त्याचे वास्तविक रूप प्रकट होऊ देत नाहीत. युध्दभूमीवर आपल्या शरीररक्षणासाठी योध्दा चिलखत धारण करतो. शेतकरी जनावरांपासून पिकाचे रक्षण करण्यासाठी शेताला कुंपण घातलो. तसे शिवदीक्षा घेतलेल्या साधकाचे दुष्प्रवृत्तींपासून अष्टावरणांमुळे रक्षण होत असल्यामुळे त्यांना 'आवरणे' अशी संज्ञा आहे. अज्ञान, माया ही देखील आवरणेच आहेत. परंतु ती आत्म्याचे मूळस्वरूप झाकून टाकतात. अष्टावरणे मात्र अज्ञान, माया ही आवरणे दूर करून आत्म्याच्या मूळस्वरूपाचे रक्षण करतात. म्हणून अष्टावरणांना 'आवरणे दूर करणारी आवरणे' असेही म्हटले जाते. या अर्थाने 'आवरण' हा शब्द इतर कोणत्याही धर्मदर्शनाने योजिलेला नाही. म्हणून 'आवरण' हा वीरशैवांचा पारिभाषिक शब्द आहे. अष्टावरणांना वीरशैव-सिद्धान्तात 'साधकाची अंगे' असेही म्हटले जाते.

लौकिक व्यवहार नीट व्हावेत यासाठी जसा हात, पाय इत्यादी अंगांचा उपयोग केला जातो तसा अष्टावरणांमुळे साधकाचा परमार्थ-व्यवहार सुरळित चालतो, म्हणून ती 'अंगे' होत.

अष्टावरणांतील मंत्र हे अंतिम परंतु आत्म्याला अतिशय जवळचे आवरण असल्यामुळे शिवसाक्षात्काराचे ते अमोघ साधन आहे. अन्य आवरणे ही बाह्य आहेत, तर मंत्र हे अंतरंग आवरण आहे. ते साधकाचे रक्षाकवच आहे. चिलखत इत्यादी रक्षाकवचांचा भेद होऊ शकतो. परंतु मंत्र या रक्षाकवचाला मात्र भेदता येत नाही. मंत्रांची संख्या सात कोटी आहे. त्यांत पंचाक्षरी मंत्र सर्वश्रेष्ठ मानला जातो:

सप्तकोटिषु मंत्रेषु मंत्रः पंचाक्षरो महान्।
ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु यथा शंभुर्महत्तरः ॥८-४॥

'नमःशिवाय' हाच पंचाक्षरी मंत्र होय. पाच अक्षरांनी युक्त असल्यामुळे याला 'पंचाक्षरी' असे नाव आहे. ब्रह्मादी सर्व देवतांमध्ये शिव ही श्रेष्ठ आणि पूज्य देवता आहे. तिला हजार नावे आहेत. त्या सर्व नावांत 'शिव' हे श्रेष्ठ नाव असल्यामुळे ते नाव ज्या मंत्रात गोवले आहे असा पंचाक्षरी मंत्र सर्वश्रेष्ठ मानला जातो.

शिवाला हजार नावे असली तरी त्या नावांनी मंत्र सिद्ध झालेला नाही. 'शिव' हे ईश्वराचे सर्वोत्तम नाव असून त्यात चारही वेदांचे सार आहे. सर्व विद्यांत वेद श्रेष्ठ आणि सर्व वेदांत श्रीरुद्र श्रेष्ठ श्रीरुद्राचे पठण म्हणजे वेदांचे पठण होय. श्रीरुद्रातील आठवा अनुवाक् म्हणजे श्रीरुद्राचे सार असून या अनुवाकातच 'नमः शिवाय च शिवतराय च' हा मंत्र आला आहे. म्हणून केवळ आठव्या अनुवाकाचे पारायण केले तरी श्रीरुद्राचे पारायण केल्याचे फळ मिळते. 'शिव' याचा अर्थ 'कल्याण करणारा' असा आहे. 'महाभारता'त शंकरांनी स्वनामाविषयी सांगितले की, दानव, सुर, असुर, मानव, पशू, पक्षी हे सर्व मला समान असून मी सर्वांचे कल्याण करणारा आहे. म्हणून मला 'शिव' असे म्हणतात.

सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व, सर्वनियंतृत्व इत्यादी मंगलमय गुण महादेवाच्या ठिकाणी असल्यामुळे त्याला 'शिव' हे अभिधान प्राप्त झाले. सर्व प्रपंचाचे विश्रांतिस्थान म्हणजे शिव. प्राणिमात्रांचे कल्याण करणारे, सर्वज्ञत्व इत्यादी

उत्कृष्ट गुण असलेले, अनादी मलत्रयदोषरहित, इच्छादी शक्तींनी युक्त, सर्व विश्वाला आधारभूत, निर्विकार, स्वयंप्रकाशित जे परशिव ब्रह्मचैतन्य तेच 'शिव' होय. पंचाक्षरी मंत्र हा त्याचेच अभिधान आहे:

तस्याभिधानमंत्रोऽयमभिधेयश्च स स्मृत:।
अभिधानाभिधेयत्वान्मंत्रात् सिद्ध: पर: शिव:॥८-६॥

पंचाक्षरी मंत्र आणि परशिव यांच्यात अभिधान-अभिधेय संबंध असल्यामुळे हा मंत्रच परमात्म्याची सिद्धी करणारा आहे.

अंतकाळी जिव्हेवर शिवनाम यावे यासाठी आयुष्यभर त्याचा जप करावा लागतो. फोटो काढताना फोटोग्राफर क्लिक् करतो त्यावेळी आपली जशी अवस्था असते तसाच फोटो येतो. त्यावेळी डोळे मिटले तर मिटल्या डोळ्यांचा फोटो येईल. भलेही मग तुम्ही त्या क्षणाआधी आणि त्या क्षणानंतर डोळे फाडून जग पाहत असाल. उपयोग काय? त्या नेमक्या क्षणी डोळे उघडे असायला हवेत.

अंतकाळ हा असाच क्षण आहे. त्यावेळीच तुमच्या जिव्हेवर शिवनाम, मंत्र आला पाहिजे. नाहीतर आयुष्यभर जप करून उपयोग नाही. आयुष्यभर प्रपंचाने चिंतन केले असेल तर अंतकाळी तेच पुढे येईल. पिच्छा सोडणार नाही.

एक म्हातारा शेवटची घटका मोजत बिछान्यावर पडला होता. आसपास चिंताग्रस्त चेहऱ्याने मुलेबाळे उभी होती. बहुधा तो केव्हा जातो याची वाट पाहत असावीत. म्हाताऱ्याने डोळे उघडले. तेव्हा त्याला दिसले की, समोर गोठ्यात वासरू केरसुणी खात आहे. त्याला हे इतरांना सांगायचे होते. पण जीभ जड झाली होती. बोलता येईना. त्याने हताशपणे सगळ्यांकडे पाहिले. शक्ती एकवटून बोलायचा प्रयत्न केला. तेव्हा त्याच्या तोंडातून फक्त 'गो - गो' एवढेच शब्द बाहेर पडले.
जवळचा एक शहाणा म्हणाला,

'बघा तो गोंविदा, गोविंदा' असे देवाचे नाव घ्यायचा प्रयत्न करतोय'

म्हाताऱ्याला 'गोठ्यात' हा शब्द उच्चारता येईना. म्हणून त्याने दुसरा शब्द उच्चारण्याचा प्रयत्न केला. तेव्हा 'वा वा' एवढेच अक्षर त्याला बोलता आले.

'पाहा, त्याला 'गोविंदा' म्हणता येईना म्हणून तो 'वासुदेव वासुदेव' हे नाव घ्यायचा प्रयत्न करतोय,' तो शहाणा म्हणाला.

म्हाताऱ्याला 'वासरू' म्हणता आले नाही. म्हणून घशातून 'के के' एवढीच अक्षरे उमटली.

'पाहा, वासुदेव म्हणता येत नाही म्हणून बिचारा 'केशवा केशवा' असे नाव घेण्याचा प्रयत्न करतोय' शहाण्याने अभिप्राय दिला.

शेवटी घरच्यांना वाटले काही झाले तरी यावेळी आपल्या बापाला देवाचे नाव घेता आले पाहिजे. त्यांनी धावाधाव करून डॉक्टरला बोलावून आणले. डॉक्टर म्हणाला,

'मी एक इंजेक्शन देतो. परंतु हा एकच वाक्य बोलून मरण पावेल!'

'चालेल', मुले म्हणाली, 'निदान मरताना त्यांना देवाचे नाव तरी घेता येईल!'

डॉक्टराने इंजेक्शन दिले. म्हाताऱ्यात एकदम शक्तिसंचार झाला. सर्वजण उत्सुकतेने ऐकू लागले. आता हा देवाचे नाव घेणार, म्हाताऱ्याने गरगरा डोळे फिरवले आणि मुलांकडे रागाने पाहत म्हणाला,

'मूर्खांनो, मघापासून गोठ्यात वासरू केरसुणी खाते ते दिसत नाही का?' एवढे बोलून त्याने मान टाकली.

जीवनभर केलेले चिंतन असे मृत्युकाळी समोर येऊन उभे ठाकते. यातून कुणाचीच सुटका नाही. म्हणून शेवटचा दिस गोड व्हावा यासाठी आयुष्यभर अट्टाहास करावा लागतो. मनाला वळण लावून त्याला शिवनामात, पंचाक्षरी मंत्रात सदोदित गुंतवून ठेवावे लागते.

शिव आणि त्याचे नाम यात भेद नाही. शिव जेवढा सामर्थ्यवान तेवढेच त्याचे नामही सामर्थ्यशाली आहे. ज्याने भवरोगाचे उच्चाटन होते असे हे दिव्य रसायन आहे. मन्मथस्वामी म्हणतात:

भवरोग जाय जेणे। ऐसे रसायन घेणे॥
नाममात्रा प्रेमरसे। घेता नासे भवरोग॥

एखाद्या मनुष्याचे लक्ष आपल्याकडे वळावे म्हणून आपण त्याला हाक मारतो तसे शिवाचे लक्ष आपल्याकडे वेधावे म्हणून त्याच्या नावाचा

सतत जप करावा लागतो. मंत्र ही परमात्म्याला मारलेली हाकच आहे. ज्याला अशी हाक मारण्याचा छंद जडतो त्याच्या एखाद्या हाकेला शिव ओ देतो आणि त्याचे जीवन कृतार्थतेच्या सुगंधाने दरवळून जाते. कुठलीही अभिलाषा मनात न उरलेला असा शिवभक्त मग स्वत:शीच गुणगुणू लागतो :

काय कैलासा करावे। मुखी शिवनाम घ्यावे॥
काय कैलासाची चाड। मन्मथ म्हणे शिव गोड॥

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# जपयज्ञ सर्व यज्ञांत

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मंत्राची पुन:पुन्हा आवृत्ती करणे म्हणजे जप. जप हा एक यज्ञ असून तो केल्याने साधकाला परमात्म्याची प्राप्ती होते. भगवद्गीतेत श्रीकृष्णाने

मी एकाक्षर वाणींत महर्षींत असे भृगु।
जप मी सर्व यज्ञांत मी स्थिरांत हिमालय॥

असे सांगून जपयज्ञाची थोरवी सिद्ध केली आहे. अन्य यज्ञ केल्याने ऐहिक आणि पारलौकिक फळे मिळतात. ही फळे पुण्यक्षयाने क्षीण होणारी असून या यज्ञांमध्ये हिंसादी दोषही घडतात. म्हणून केवळ परमात्मप्राप्ती हेच ज्याचे फळ आहे आणि ज्यात कोणताही दोष नाही असा जपयज्ञच सर्व यज्ञांमध्ये श्रेष्ठ आहे.

पंचाक्षरी मंत्रात 'शिव' हे नाव गुंफल्यामुळे हा मंत्र सर्वश्रेष्ठ ठरला शिवाची नावे तर हजार आहेत मग 'शिव' या नावालाच एवढे महत्त्व का? तर 'शिव' ही दोन अक्षरेच शिवाचा सरळ, साक्षात् बोध करणारी आहेत, ती परब्रह्माची प्रकाशक आहेत. सिंह आणि पुरुषसिंह या दोन शब्दांपैकी 'सिंह' या शब्दाने सिंहाच्या साक्षात स्वरूपाचा बोध होतो तर 'पुरुषसिंह' या शब्दाने सिंहाच्या क्रौर्य, शौर्य इत्यादी गुणांचाच फक्त बोध होतो, प्रत्यक्ष सिंहाचा होत नाही. तसा 'शिव' शब्दाने साक्षात् परब्रह्माचा बोध होतो तर त्याच्या इतर नावांनी त्याचा त्याच्या गुणांद्वारे बोध होतो. म्हणून 'शिव' हे नाम सर्व नामांत श्रेष्ठ आणि शिवनाम पंचाक्षरी मंत्रात असल्यामुळे सर्व मंत्रात पंचाक्षरी मंत्र श्रेष्ठ आहे.

'शिव' या नामाचे अनेक अर्थ लावले गेले. त्याच्या ठिकाणी सर्वज्ञत्व, नित्यतृप्तत्व, अनादिबोधत्व, स्वतंत्रत्व, अलुप्तशक्तित्व आणि अनंतशक्तिमत्व हे षडगुणेश्वर्य असल्यामुळे त्याला शिव म्हणतात (शिवाः गुणाः अस्य संतीति शिवः). तो शोभन म्हणजे शुद्ध आहे., म्हणून तो

शिव (शोभनत्वात् शिव:) तो स्वयंप्रकाश असून त्याच्या प्रकाशाने समस्त प्रपंच प्रकाशित होतो म्हणून तो शिव होय (वष्टीति शिव:). तो प्राणिमात्रांचे विश्रांतिस्थान आणि चराचर प्रपंचाचा आधार आहे म्हणून त्याचे नाव शिव आहे (शेतेऽस्मिन् सर्वमिति शिव:). तो विकाररहित आहे म्हणून शिव (शाम्यतीति शिव:). शिवनामाचे श्रेष्ठत्व असे अनेक प्रकारे वर्णिले आहे.

नामस्मरण हे परमात्मप्राप्तीचे कलियुगातील सुलभ साधन आहे. तुलसीदास म्हणतात :

नाम लेत भवसिंधु सुखाये।

त्याचे नाव घेतल्यावर भवसागर आटून कोरडा होतो. नामजप हे सूत्र म्हणजे दोरी आहे. त्यामुळे जीवाचा ईश्वराशी संबंध जुळतो.

एक म्हातारी विश्वनाथाच्या मंदिरात दर्शनासाठी गेली. तिथे तिला दिसले की सर्वच लोक 'दीनबंधु दीनानाथ।मेरी डोरी तेरे हाथ' असा घोष करीत आहेत. तिलाही आपण घोष करावा असे वाटले. म्हणून ती देखील सर्वांसोबत घोष करू लागली. शब्द मागेपुढे झाले. ती मोठ्याने म्हणू लागली

'दीनबंधु दीनानाथ। तेरी डोरी मेरे हाथ'

शेजारी असलेल्या पंडिताने तिचा घोष ऐकून म्हटले,

'आजीबाई तुम्ही उलटे म्हणत आहात. 'तेरी डोरी मेरे हाथ' असं नाही. 'मेरी डोरी तेरे हाथ' असं म्हणा

त्यावर म्हातारी उत्तरली, 'तेरी डोरी मेरे हाथ' काय अन् 'मेरी डोरी तेरे हाथ' काय, दोरी हाती असली म्हणजे झालं. मग ती कुणाच्या का हाती असेना.'

तसे ईश्वराशी संबंध असणे महत्वाचे. त्याचे नाम कोणत्याही निमित्ताने सरळ अथवा उलटे घेतले तरी त्याचे सुफल मिळणारच. तुलसीदास म्हणतात :

भूमि पडे उपजेंगेहि उलटे सीधे बीज।

जमिनीत बी सरळ उलटे कसेही पडले तरी ते उगवणारच. तसे शिवनामाचे माहात्म्य आहे. 'राम' म्हणण्याची पात्रता नसलेला वाल्ह्या 'मरा' असे उलटे नामस्मरण करून वाल्मीकी महर्षी झाला. परंतु या नामस्मरणाची गोडी मात्र मनुष्याला लागत नाही. त्याच्या ओठावर शिव्या असतात, ओव्या नसतात. शिव्या देण्यात आणि गलिच्छ बोलण्यात तो स्वत:ला धन्य समजतो. पण शाश्वत सुख देणारे शिवनाम त्याच्या जिव्हेवर येत नाही. त्याला शिवनामाची गोडी सांगावी लागते, कळत नाही. मुंगीला साखरेची गोडी सांगावी लागत नाही..

एका गृहिणीने सर्व स्वयंपाकघरातल्या डब्यांवर लेबले लावून ठेवली. डाळ, तांदूळ , साखर इत्यादी. वस्तू पटकन् सापडावी हा तिचा उद्देश होता. पण तिच्या लक्षात आले की साखरेच्या डब्यात मुंग्या शिरत आहेत. म्हणून तिने साखर दुसऱ्या डब्यात ठेवली. साखरेच्या डब्यात मिरच्यांची पूड ठेवली. लेबल तसेच राहिले.

एकदा पतिराजांना चहा करण्याची लहर आली. एखादेवेळी कपभर चहा करून बायकोच्या हाती ठेवला तर ती खूष होते हे अनुभवाने त्याला माहीत होते. त्यात रात्रीची वेळ, बायकोला खूष करण्याची वेळ. मोठ्या उत्साहाने तो स्वयंपाकघरात गेला. पातेल्यात पाणी ठेवले. 'साखर' असे लेबल पाहून डबा हाती घेतला. तेवढ्यात वीज गेली आणि अंधार झाला. अंधारात त्याने साखर, चहापूड घातली. वीज आली. दोन कप घेऊन मोठ्या खुषीत तो बायकोजवळ आला. ती कोचावर आरामात बसलेली. कप तिच्या हाती दिला. आणि स्वत: कप ओठाला लावून एक घोट घेतला मात्र. त्याला भयंकर ठसका लागला.

बायकोला काय घडले ते क्षणभर कळलेच नाही. ती स्वयंपाकघरात जाऊन पाहते तो 'साखर' लेबल लावलेला डबा शेगडीजवळ पडलेला आणि ज्या डब्यात साखर ठेवलेली त्या डब्याला मुंग्यांची रांग लागलेली. ती बाहेर येऊन त्याला म्हणाली,

'अहो साखर कुठे आहे हे लहानशा मुंगीला देखील कळते, पण तुम्हाला मात्र कळले नाही!'.

मुंगीला साखर कोठे आहे ते कळते. ती लेबल पाहून डब्यात शिरत नाही. कारण ती गुणग्राही आहे, मनुष्य मात्र अक्षरग्राही आहे. शिवनामात सुख आहे, हे त्याला पुन:पुन्हा सांगावे लागते.

शिवनाम आणि त्याने सिद्ध झालेला मंत्र हे ईश्वराशी आपला संबंध जोडणारे सूत्र आहे. 'तत् त्वम् असि' हे वेदान्तातील महावाक्य असून 'ते तूच आहेस' अर्थात् जीवात्मा परमात्माच आहे असा त्याचा अर्थ आहे. पंचाक्षरी मंत्राचाही अर्थ हाच आहे. 'नमः' म्हणजे जीवात्मा, 'शिव' म्हणजे परमात्मा आणि 'अय' म्हणजे ऐक्य .पंचाक्षरी मंत्र हा शिव आणि जीव यांच्यातील अद्वैताचा बोधक आहे. पंचाक्षरी मंत्र वेगवेगळ्या बीजाक्षरांनी युक्त झाल्यावर तो प्रसादपंचाक्षर, मायापंचाक्षर, सूक्ष्मपंचाक्षर, स्थूलपंचाक्षर, मूलपंचाक्षर अशा नावांनी ओळखला जातो.

मूल, विद्या, शिव, शैवसूत्र आणि पंचाक्षर अशी या मंत्राची पाच नावे आहेत. परशिव हा सर्व तत्त्वांचे मूलकारण असून हा मंत्र परशिवाचा वाचक असल्यामुळे आणि सर्व अक्षरांचे मूळ असल्यामुळे याला 'मूल' असे एक नाव आहे. पंचब्रह्म , पंचतन्मात्रा, पंचमहाभूते, पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये इत्यादी सर्व पंचकांचे मूळ आणि सप्तकोटी मंत्रांचे उत्पत्तिस्थान व विलयस्थान हाच मंत्र आहे. या मंत्राचे निरंतर मनन केल्याने साधकाच्या मनात शिव व जीव यांच्यातील अभेदरूपी शुद्ध विद्येचा उदय होतो, म्हणून याचे 'विद्या' असे दुसरे नाव आहे. हा मंत्रजप केल्यामुळे साधकाचे अनेकप्रकारे कल्याण होते. अर्थात् हा मंत्र कल्याणप्रद असल्यामुळे याला 'शिव' असे म्हणतात. हा मंत्र शिवाचा सूचक असल्यामुळे आणि साधकाला शिवापर्यंत घेऊन जाणारे सूत्र असल्यामुळे याला 'शैवसूत्र' असे नाव आहे. मंत्र हे जसे रक्षाकवच आहे तसे सूत्रही आहे. सूत्र म्हणजे दोरा. दोऱ्याचे एक टोक हाती आले म्हणजे त्याचे दुसरे टोक शोधून काढता येते. तसे मंत्र हे सूत्र आहे. त्याच्यामुळे शिवापर्यंत पोचता येते. ब्रह्मसूत्राचे अध्ययन केल्यावर जसे ब्रह्मापर्यंत पोचता येते, तसे शैवसूत्राचे मनन केल्यावर शिवापर्यंत पोचता येते. हा मंत्र पाच अक्षरांनी युक्त आहे म्हणून याला 'पंचाक्षर' असेही नाव आहे. पंचाक्षरी मंत्र जेव्हा ॐकारयुक्त होतो तेव्हा त्याला षडक्षरी मंत्र म्हणतात. ॐकार हा शिवाच्या निर्गुणरूपाचा बोधक आहे तर पंचाक्षरी हा शिवाच्या सगुणरूपाचा बोधक आहे. म्हणून षडक्षरी मंत्र सगुण-निर्गुण परब्रह्माचा वाचक होय. याचा जप करणाऱ्यावर सगुण शिवाचा अनुग्रह होऊन ऐहिक सुखे प्राप्त होतात. असा परशिवाशी ऐक्य घडविणारा निर्दोष व सर्वफलदायी जपयज्ञ साधकाने अवश्य करावा.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# मानसिक जपाकडे

जिज्ञासू सद्भक्तांनो,

समुद्राचे पाणी आपण पिऊ शकत नाही. परंतु त्याच पाण्याची वाफ होऊन मेघ होतात, पाऊस पडतो, विहिरी-तळी भरतात आणि ते पाणी मात्र आपण पितो. हा संस्काराचा महिमा आहे. तसाच दीक्षासंस्काराशिवाय, गुरुमुखातून ऐकल्याशिवाय जर मंत्रजप केला तर तो निष्फल ठरतो. केवळ पुस्तकात वाचून मंत्र जपता आला असता तर भारतीय धर्मपरंपरेत गुरूमाहात्म्य गायिले गेले नसते. असा मंत्रजप करणे म्हणजे समुद्राचे पाणी पिणे होय. कुमारिकेच्या पोटात वाढणारा गर्भ समाजमान्य नसतो, तसा दीक्षासंस्कारावाचून केलेला जप शास्त्रसंमत नाही. जपाचे अनेक प्रकार असले तरी अत्यंत सूक्ष्म असा सध्यान मानसिक जप शीघ्र फल देणारा आहे. त्यामुळे ईश्वराशी सहज संबंध जुळतो. मोठ्याने जप करून परिसरातील शांतता बिघडवून ईश्वराचा नामजप केला तर तो फलदायी होत नाही. कबिरांनी म्हटले आहे:

काँकर पाथर जोरिकै मसजिद लै चुनाय।
ता चढि मुल्ला बाँग दे क्या बहिरा हुवा खुदाय ?॥

ईश्वर बहिरा नाही आणि ओरडून त्याला हाक मारावी एवढा दूर देखील नाही. तो तर आपल्या अतिशय जवळ, हृदयातच बसलेला आहे. जवळ बसलेल्या माणसाला जर मोठ्याने हाक मारली तर तो दचकतो. तसे तुम्ही ईश्वराच्या नावाने ओरडायला लागला तर तो देखील दचकतो. याबद्दल एक मार्मिक कथा सांगितली जाते.

आयुष्यभर ज्याने मोठमोठ्याने देवाच्या नावाचा जप केला असा एक मनुष्य मरण पावला. मृत्यूनंतर त्याच्या जीवात्म्याला ईश्वरासमोर नेण्यात आले. ज्याने कधीही ईश्वराचे नाव घेतले नाही असा दुसरा एक माणूसही मरून तेथे आला होता. तो पहिल्याचा शेजारी होता. दोघांच्या पाप-पुण्याचा

पाढा वाचला गेला. ईश्वराने निर्णय दिला,

'पहिल्या मनुष्याला नरकाकडे न्या, दुसऱ्याला स्वर्गाकडे न्या.'

पहिला मनुष्य कळवळला. म्हणाला, 'देवा, मी आयुष्यभर तुझ्या नावाचा जप केला. मोठ्याने केला. लाऊडस्पीकरवरून तुझे नाव घेऊन लोकांना ऐकवलं आणि हा समोरचा माझा शेजारी कधी देवळात गेला नाही, कधी. त्याने तुझे नाव घेतले नाही. तरी त्याला स्वर्ग अन् मला नरक? तुझ्या राज्यात अंधारच दिसतो मला. माझ्यावर अन्याय होतोय.'

ईश्वर हसून म्हणाला, 'भल्या माणसा,म्हणूनच तर तुला नरकात पाठवणार. अरे, तू कधी सुखाने मला झोपू दिलं नाहीस. सारखं माझं नाव घेऊन गोंधळ घातला. या बिचाऱ्यानं तेवढं तरी केलं नाही. म्हणून त्याला स्वर्गात पाठवतो आहे!'

मंत्रजप हे प्रदर्शन नाही. ते हृदयातल्या ईश्वराला केलेले आवाहन आहे. म्हणून तो सहज, मानसिक असावा तरच फलदायक ठरेल. वाचिक, उपांशू व मानसिक असे जपाचे तीन भेद आहेत. मंत्र जपताना तो इतरांना जेव्हा स्पष्ट ऐकू जातो तेव्हा त्याला 'वाचिक जप' म्हणतात. ओठातल्या ओठात मंत्राचे उच्चारण होऊन तो जेव्हा दुसऱ्याला ऐकू जात नाही, तेव्हा त्याला 'उपांशू जप' असे म्हटले जाते. आणि ओठांची हालचाल न करता केवळ मनातल्या मनात जेव्हा जप केला जातो तेव्हा त्याला 'मानसिक जप' असं म्हणतात. वाचिक जपापेक्षा उपांशू जप श्रेष्ठ आहे आणि उपांशू जपापेक्षा मानसिक जप श्रेष्ठ आहे. वाचिक जपाचे फल एकपट, उपांशू जपाचे फल शंभरपट तर मानसिक जपाचे फल सहस्रपट आहे, असे 'सिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे:

माहात्म्यं वाचिकस्यैतज्जपयज्ञस्य कीर्तितम्।
तस्माच्छतगुणोपांशुः सहस्रो मानसः स्मृतः॥ ८-३१ ॥

मानसिक जप करणाऱ्या साधकाला पातकांचा स्पर्श होत नाही, म्हणून हा जप श्रेष्ठ मानला जातो.

अगर्भ, सगर्भ आणि सध्यान असे जपाचे आणखी भेद मानले जातात. प्राणायाम न करता केला जाणारा जप 'अगर्भ जप' असून

प्राणायामासहित केला जाणारा जप हा 'सगर्भ जप' म्हटला जातो. जेव्हा जप करताना शिवध्यान केले जाते तेव्हा त्या जपाला 'सध्यान (अर्थात ध्यानयुक्त) जप' असे म्हणतात. वाचिक , उपांशू व मानसिक या जपांपैकी मानसिक जप श्रेष्ठ आहे तर अगर्भ, सगर्भ व सध्यान या जपात सध्यान जप श्रेष्ठ आहे. म्हणून 'सध्यान मानसिक जप' हा शीघ्र व अधिकाधिक फल देणारा आहे, यासाठी साधकाने या जपाचा अवलंब केला पाहिजे. सगर्भ जप करताना चाळीस वेळा किंवा पाच वेळा किंवा कमीतकमी तीन वेळा प्राणायाम केला पाहिजे. मंत्रजप करताना गुरूकडून मंत्राचे ऋषी, छंद, देवता, बीज, शक्ती व कीलक यांचे ज्ञान करून घेणे आवश्यक आहे. पंचाक्षरी मंत्राचे ऋषी वामदेव, छंद पंक्ती, देवता सदाशिव, बीज ॐकार, शक्ती उमा आणि कीलक शिव आहे. या सर्वांना साधकाने जप करताना आपल्या विभिन्न अवयवांत आवाहन करून न्यास अर्थात प्रतिष्ठित करावे लागते. न्यास व जपविधान गुरूकडून समजून घ्यावे. जप करताना गृह, देवघर, गोशाला, पवित्र वन, रम्य पर्वतशिखर, नदीकाठ किंवा देवालय यांपैकी एखाद्या स्थानी पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख होऊन करावा. तो सूर्य, अग्नी, गुरू, चंद्र, दीप, विप्र किंवा गाय यांच्या साक्षीने करावा. जप करतेवेळी कृष्णमृगाजिन, व्याघ्रचर्म, कुशासन, कंबलासन, यांपैकी एखाद्या आसनावर बसून जप करावा. जपगणना करताना अंगुलीरेखा, कमलबीज, शंखमणी, पोवळे, स्फटिक, मोती, सुवर्णमणी, दर्भमाला अथवा रुद्राक्षमाला यांपैकी एकीचा उपयोग करावा. रुद्राक्षमाला घेऊन डाव्या हातावर इष्टलिंग ठेवून त्याच्या साक्षीने केला जाणारा जप असंख्यपटीने फलदायी आहे, असे 'सिद्धांतशिखामणी' त म्हटले आहे. वाचिक जपाकडून मानसिक जपाकडे आणि तेथून सध्यान मानसिक जपाकडे साधकाने वाटचाल करावी. मग शिवदासांनी म्हटल्याप्रमाणे

जिव्ही नाम श्रवणी कीर्ती। नेत्री वसो तुझी मूर्ती॥
विसरोनि देहभाव। तुज न सोडो हा जीव॥

अशी शिवभक्तांची भावाकुल अवस्था व्हायला किती वेळ लागणार?

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# मांसपिंड आणि मंत्रपिंड

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मनुष्याचा देह म्हणजे मांसपिंड. हा मांसपिंडच मंत्रसंस्काराने मंत्रपिंड होतो. तिळांत तेल असते आणि फुलांत सुगंध असतो. आयुर्वेदातील 'भावना' संस्काराने फुलांतील गंध तेलात उतरतो आणि तेल सुगंधित होते. तसा मातापित्यापासून लाभलेला देह प्रथम मांसपिंड असतो, परंतु गुरूपदेशानंतर साधकाने निरंतर मंत्रजप केल्यावर त्याच्या मांसपिंडाचे मंत्रपिंडात परिवर्तन होते.

हा 'भावने' चा महिमा आहे. भावना म्हणजे काय?

'भावो मानसचेष्टात्मा परिपूर्णः शिवात्मकः॥' मनाची शिवमय झालेली वृत्ती म्हणजेच भाव, भावना! वाणी देहाच्या बाहेर असते आणि मन देहाच्या आत. देह म्हणजे मांसपिंड, वाणी आणि मन यांच्या मध्ये असतो. खाली फुलाची पाकळी, वर फुलाची पाकळी आणि मध्ये तिळाचा दाणा. अशा अवस्थेत तिळाला सुगंध लाभतो. तसा मुखाने मंत्रोच्चार आणि मनाने मानसजप घडला तर वाणी आणि मन यांच्यामधला मांसपिंड मंत्रमय होतो. त्याचे अंगांग मंत्रमय होऊन जाते.

चोखामेळा हा विठ्ठलाचा भक्त होता. सारे आयुष्य त्याने विठ्ठलचिंतनात घालवले होते. मंगळवेढ्याला कुसू बांधताना ते कोसळले आणि त्याखाली अनेक माणसे मरण पावली. त्यात विठ्ठलभक्त चोखामेळा देखील होता. पंढरपूरला हे वृत्त कळल्यावर देवाने नामदेवाला सांगितले,

'नामदेवा, मंगळवेढ्याला जाऊन चोखामेळ्याच्या अस्थी गोळा करून आण'

नामदेवाला प्रश्न पडला. त्याने विचारले,

'देवा, तिथे खूप माणसे मेली आहेत. हाडांचा खच पडला असेल. त्यातून चोखामेळ्याच्या अस्थी कशा हुडकून काढता येतील? ते अशक्य आहे'.

तेव्हा देव म्हणाला,

'अरे वेड्या, फार सोपे आहे ते. प्रत्येक अस्थी कानाला लावून बघ. ज्यातून 'विठ्ठल विठ्ठल' असा नाद येत असेल ती अस्थी चोखामेळ्याची आहे असे समज !'.

त्याप्रमाणे नामदेवांनी चोखामेळ्याच्या अस्थी गोळा करून आणल्या.

मासपिंडाचा मंत्रपिंड असा झालेला असतो. ज्याच्या रोमरोमांतून मंत्र झंकारत असतो तो मंत्रपिंड होय. मंत्रजप साधकाच्या पिंडपरिवर्तनाची पायरी आहे. मंत्रजप कसाही करून चालत नाही. तो शास्त्रोक्त विधीने केला तरच फलदायक ठरतो. अन्यथा निष्फल होतो. जप करताना काही गोष्टी निषिद्ध मानल्या आहेत. फेटा बांधून, कपडे घालून, नग्न होऊन, केस मोकळे सोडून अथवा इतरांशी बोलत असता जप करणे निषिद्ध आहे. क्रोधित होऊन, मदांध होऊन, झोप आली असताना आणि जांभई देत जप करू नये. जर मनात हे विकार उद्‌भवले तर प्रथम आचमन करून प्राणायाम करावा आणि शिवस्मरण करून जप करावा. तसेच भोजन करताना, चालताना , उभे राहून, रस्त्यावर अथवा अपवित्र स्थानी जप करणे निषिद्ध मानले जाते. जप करताना पाय पसरून बसू नये, चिंतामग्न होऊ नये. गुरुमंत्र नेहमी गुप्त ठेवून वरील निषिद्ध गोष्टींना टाळून साधकाने श्रध्दापूर्वक मंत्रजप करणे आवश्यक आहे.

अभक्त, अक्षरभ्रान्त, लुप्त, छिन्न, ऱ्हस्व, दीर्घ, कथन आणि स्वप्नकथन हे मंत्रजपाशी संबंध असलेले दोष असून ते टाळून मंत्रजप करणे श्रेयस्कर होय. मंत्रावर श्रद्धा नसणे हाच 'अभक्त' दोष. अक्षरांचा चुकीचा उच्चार म्हणजे 'अक्षरभ्रान्त'. मंत्रजप करताना मंत्रातील एखाद्या अक्षराचा लोप होणे याला 'लुप्त' दोष म्हणतात. जोडाक्षरांचा स्वतंत्र उच्चार करणे हा म्हणजे 'छिन्न' दोष होय. मंत्रातील दीर्घस्वरांचा ऱ्हस्व उच्चार करणे हा 'ऱ्हस्व' दोष तर ऱ्हस्व स्वरांचा दीर्घ उच्चार करणे हा 'दीर्घ' दोष आहे. इतरांसमोर मंत्रोच्चार करणे म्हणजे 'कथन' दोष आणि स्वप्नात इतरांसमोर मंत्रोच्चार करणे हा 'स्वप्नकथन' दोष होय. म्हणून साधकाने गुरुमंत्र सदैव गुप्त ठेवावा असे मंत्रशास्त्रात सांगितले आहे. मंत्रात जेवढी अक्षरे आहेत त्यांतील एका अक्षरास एक लाखाच्या हिशेबाने त्याला चारपट करून जप करणे याला 'पुरश्चरण' म्हणतात. गुरूकडून मंत्रोपदेश घेतल्यानंतर पुरश्चरण अवश्य करावे. अन्यथा पुरश्चरणाशिवाय केलेला मंत्रजप निष्फल होतो, असे मंत्रशास्त्रात म्हटले आहे. परंतु पंचाक्षरी मंत्राचे वैशिष्ट्य असे

की, पुरश्चरण न करता त्याचे एकदा जरी पठण केले तरी तो निष्फळ होत नाही. जपाचे नियम न पाळता, देहशुध्दीची तमा न बाळगता, पतित, दुराचारी अथवा पापी यांपैकी कोणीही एकवेळा पंचाक्षरी मंत्रजप केला तरी त्यांचा उद्धार होतो, असे 'सिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहे:

सकृदुच्चारमात्रेण पंचाक्षरमहामनो:।
सर्वेषामपि जंतूनां सर्वपापक्षयो भवेत्॥ ८-३९ ॥

पंचाक्षरीशिवाय इतर सर्व मंत्रांच्या बाबतीत जपाचे सर्व नियम पाळावे लागतात व मंत्राची पुन: पुन्हा आवृत्ती अर्थात् जप करावा लागतो तेव्हा ते मंत्र फलदायी ठरतात. परंतु पंचाक्षरी मंत्र एकदा जपला तरी फलदायी ठरतो. या मंत्राचा एकवेळ उच्चार करून सानंद नामक योग्याने नरकातील वीस कोटी जीवांचा उद्धार केला, शतानंदाने नरकाचेच स्वर्गात रूपांतर केले आणि उपमन्यू हा शैवशास्त्राचा आचार्य झाला. वसिष्ठवामदेवादी ऋषी या मंत्रजपानेच शापानुग्रहास समर्थ झाले आणि ब्रह्मादी देवांना या मंत्रामुळे विश्वनिर्मितीचे, पालनाचे व संहाराचे सामर्थ्य लाभले. कित्येक साधकांनी या मंत्रानेच दुर्लभ असा मोक्ष मिळविला. असा साधकाचा देह मंत्रपिंड करणारा पंचाक्षरी मंत्र. त्याची महती मन्मथस्वामींनी गायिली आहे:

मूळ मंत्र पंचाक्षर। जपता पार भवसिंधू॥
नारीनरा सकळिका। नाही धोका या मार्गी॥
मन्मथ म्हणे धरा कंठी। लाभ पोटी साठवा॥

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# समष्टिपरिवर्तन

जिज्ञासू सद्भक्तांनो,

सुष्ट अथवा दुष्ट भावनांचा आसपासच्या परिसरावर आणि वातावरणावर निश्चित परिणाम होत असतो. प्राचीन काळी ऋषिमुनींच्या आश्रमांत वाघ, सिंह, मृग इत्यादी परस्परांचा द्वेष करणारे प्राणी एकत्र सामंजस्याने राहत असत, असे आपण जुन्या ग्रंथांत वाचतो. 'अद्वेष्टा सर्वभूतानाम्' अशा ऋषींच्या शुद्ध भावनेचा परिणाम पशुपक्ष्यादिकांवर होऊन ते द्वेषभावना विसरत असत. या प्रमाणे एखाद्या व्यक्तीने मंत्रजप केला तर ती व्यक्ती जशी शुद्ध आणि पवित्र होते त्याप्रमाणे जर सामूहिक नामजप केला तर आसपासचा परिसर शुद्ध होतो. व्यष्टीप्रमाणे समष्टीमध्येही परिवर्तन होते.

'फुलासंगे मातीस वास लागे' अशी एक म्हण आहे. फुलाच्या संगतीने मातीदेखील सुगंधित होते. ज्याचा देह मंत्रपिंड झाला त्याच्या स्पर्शाने जडवस्तू देखील मंत्रमय होतात. ज्ञानेश्वरांनी भिंत चालवली, अशी कथा आपण ऐकतो. असे घडणे शक्य नाही, असे आपल्याच जडबुद्धीने ठरवतो. आपल्याला ज्ञानेश्वरांचा स्पर्श कोठे माहीत आहे? त्यांच्या स्पर्शाने जडभिंतीत देखील चैतन्य जागे झाले असेल. वीरशैव-सिद्धान्तात तर जडवस्तूंत देखील गूढरूपाने चैतन्य वसते, असे म्हटले आहे. ते जागे करणे एवढेच स्पर्शाचे काम.

कबीर जनाबाईच्या भेटीला आले अशी एक आख्यायिका आहे. दूरचा प्रवास करून ते तिच्या गावी, गंगाखेडला आले. त्यांनी तिचे घर शोधले. तेथे आल्यावर त्यांना दिसले की दोन स्त्रिया दाराबाहेर एकमेकींशी वाद घालत उभ्या आहेत. त्यांच्या समोर शेणाच्या गोवऱ्या थापलेल्या होत्या. त्यातल्या काही गोवऱ्या माझ्या आहेत असे एकीचे म्हणणे होते. तर दुसरी सगळ्या गोवऱ्या माझ्या आहेत, असे म्हणत होती.

कबिराला मोठे आश्चर्य वाटले. एकीसारख्या एक दिसणाऱ्या गोवऱ्या.

त्यांत आपल्या गोवऱ्या ही स्त्री कशी ओळखणार? त्यांनी विचारले, 'बाई, तू तुझ्या गोवऱ्या वेगळ्या काढून दाखवशील? त्या तुझ्याच कशावरून?'

ती स्त्री हंसली. तिने एक गोवरी उचलली. आधी आपल्या कानाला लावली. नंतर कबिराकडे देऊन म्हणाली,

'ही बघ माझी गोवरी?' कबिरांनी गोवरी कानाला लावली तर काय आश्चर्य! 'विठ्ठल विठ्ठल' असा नाद त्यांना ऐकू आला. त्यांनी ओळखले की जिला आपण भेटायला आलो तीच ही जनाबाई!

संतस्पर्शाने जडवस्तूदेखील अशा बोलू लागतात. ज्याचा देह मंत्रपिंड झाला त्याच्या स्पर्शाची ही कथा आहे. समष्टीत परिवर्तन करण्याचे सामर्थ्य संतस्पर्शात असते. असेच सामूहिक नामजपाने वातावरण पवित्र होते. अशुद्ध भावनांमुळे केवळ मनुष्याचे मनच नव्हे तर सर्व आसमंतच दूषित झाला आहे. व्यक्तीच्या भावनांचा प्रभाव परिसरावर पडतो. बहुसंख्य माणसांची मने रागद्वेषादी विकारांनी बरबटलेली असल्यामुळे त्याचा परिणाम वातावरणावर निश्चितच झाला आहे. हा प्रभाव दूर करून सबंध वातावरणात शुद्ध व सात्त्विक भावनांची पखरण करणे हे केवळ एका मनुष्याचे काम नाही. एकाच शुद्ध भावनेच्या मनुष्यामुळे संपूर्ण वातावरणात परिवर्तन होणार नाही. यासाठी बहुसंख्य लोकांनी एकत्र येऊन समष्टिपरिवर्तनाच्या इच्छेने सामुहिक जप केला तरच वातावरण शुद्ध होऊ शकेल. वातावरणाच्या परिशुद्धीसाठी सामूहिक नामजप व सामूहिक प्रार्थना यांचीच आधुनिक काळात अत्यंत गरज आहे.

देवालयात गेलेल्या मनुष्याची मनोभावना आणि चित्रपटगृहात किंवा मद्यालयात गेलेल्या मनुष्याची मनोभावना यांच्यात निश्चितच महदंतर असते. देवालयातील वायुमंडल पूजापाठ, मंत्रोच्चार इत्यादींमुळे अतिशय पवित्र झालेले असते. या वायुमंडलात शिरलेल्या मनुष्याच्या मनाला दूषित भावनेचा स्पर्श होणे कठीण असते. या उलट चित्रपटगृह आणि तत्सम ठिकाणचे वायुमंडल दूषित, उत्तान भावनांनी भारलेले असते. या वायुमंडलात राहणाऱ्या मनुष्याच्या मनाला शुद्ध भावनेचा स्पर्श होणे कठीण आहे. म्हणून आपल्या भोवतीचे वायुमंडल शुद्ध करणे हे प्रत्येक मनुष्याचे नैतिक कर्तव्य आहे. मंत्रोच्चार करून साध्या खाद्य पदार्थाला स्पर्श केला तर तो 'प्रसाद' होतो आणि साध्या पाण्याला स्पर्श केला तर ते 'तीर्थ' होते. त्याप्रमाणे सामूहिक नामजपामुळे वातावरण पवित्र होते.

महर्षी अरविंद आदी योगीपुरुषांनी याच कारणासाठी सामूहिक मंत्रजप व सामूहिक ध्यान यांवर भर दिला आहे. त्यांनाही हेच समष्टिपरिवर्तन अभिप्रेत होते. वाराणशीला महामहोपाध्याय पं. गोपीनाथ कविराज यांनी याच कारणासाठी अखंड योगाचा पुरस्कार केला. प्रत्येक मनुष्य योगी व्हावा ही तळमळ या पाठीमागे आहे. गीतेतदेखील 'अर्जुना, तू योगी हो' असा श्रीकृष्णांनी अर्जुनाला उपदेश केला आहे. मंत्रशक्तीमुळे जड पदार्थातदेखील परिवर्तन होते. दगडाचे 'लिंग' होते आणि दगडाची 'मूर्ती' होते ती मंत्रसंस्कारामुळेच. अरविंद महर्षी इत्यादींनी आधुनिक काळात तो समष्टिपरिवर्तनाचा प्रयोग केला तो अगदीच नवीन नसून प्राचीन काळी प्रचलित असलेल्या वीरशैवांच्या 'शिवयोगा'चाही उद्देश हाच होता. कुटुंबातील केवळ एका मनुष्याने मंत्रजप करण्यापेक्षा सर्वांनीच केला तर त्या कुटुंबातील वातावरण अत्यंत शुद्ध होईल. या न्यायाने गाव, देश आणि जग हे सर्वच शुद्ध होऊ शकेल. यासाठी प्रत्येक मनुष्याने शुद्ध भावनेने प्रयत्न करणे आवश्यक आहे. सर्व स्तरांवर अशा प्रयत्न झाला तर समाजाची अवस्था 'हरनाम घेता ओठी। सुख भरे पाठीपोटी॥' अशी मन्मथस्वामींनी वर्णिल्यासारखी होईल, यात संदेह नाही.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# सुगंधाने दरवळलेले जीवन

जिज्ञासू सद्भक्तांनो,

मुक्ती देणाऱ्या अनेक साधनांत भक्ती हे एक श्रेष्ठ साधन आहे. पूज्य व्यक्तीविषयी अनुराग म्हणजे भक्ती होय, असे महर्षी नारदांनी भक्तिसूत्रात म्हटले आहे. अनुराग म्हणजे प्रेम. मनुष्य प्रेमाशिवाय जगू शकत नाही. सामान्य माणसाचे प्रेम धन, गृह, शेती, पत्नी, मुले इत्यादी प्रापंचिक वस्तूंच्या आणि व्यक्तींच्या दिशेने प्रवाहित झालेले दिसते. याच प्रेमाला अलौकिक अशा परमात्म्याकडे वळवले तर ती 'भक्ती' होते. ईश्वराचा निवास केवळ मंदिरात नसतो तर प्राणिमात्रांच्या हृदयांत असतो. म्हणून प्राणिमात्रांवर प्रेम करणे हीच ईश्वरभक्ती होय.

ईश्वरविषयक भक्ती आपल्या मनात उत्पन्न होण्यासाठी मानवी जीवनातील दु:खच कारणीभूत आहे. दु:ख भोगणारा मनुष्यच जीवनाचा आणि जीवनातील शाश्वत सत्यांचा विचार करायला प्रवृत्त होतो. सुखी मनुष्याला त्याची जाणीवदेखील नसते. दु:खाच्या एका फटक्यानेच माणूस दीनवाणा होऊन ईश्वराचा आधार शोधू लागतो. सुखी जीवांना ईश्वराचे विस्मरण होते. ते भक्तिमार्गाकडे वळत नाहीत. म्हणूनच महाभारतातील कुंती 'मला सदैव दु:खात ठेव' अशी श्रीकृष्णाला विनंती करते. कबीर म्हणतात:

दुखमें सुमिरन सब करै
सुखमें करै न कोय,
यदि सुख में सुमिरन करै
तो दुख काहे को होय?

दु:खात सगळेच ईश्वराची आठवण करतात, सुखात असताना करीत नाहीत. सुखात असताना ईश्वरस्मरण केले असते तर दु:ख कशाला झाले असते?

एका राजाच्या राज्यावर शत्रूने आक्रमण केले. तेव्हा आपला जीव

वाचवण्यासाठी राजा पळून गेला आणि एका डोंगरातल्या गुहेत दडून बसला. भीतीमुळे त्याला बाहेर येता येईना. त्याची उपासमार होऊ लागली. गुहेला एक फट होती. तिच्यातून त्याने बाहेर पाहिले. बाहेर रस्ता होता. अधूनमधून त्यावरून लोक जाताना दिसले. त्याने बऱ्याच वेळा हाका मारल्या. पण त्याच्याकडे कोणी पाहिले देखील नाही.

राजाजवळ तीन अमूल्य रत्ने होती. त्याला वाटले, एवढ्या हाका मारूनदेखील कोणी आपल्यांकडे पाहिले नाही. एकेक रत्न फेकावे म्हणजे एखाद्याचे लक्ष आपल्याकडे जाईल. तेवढ्यात त्याला दोन स्त्रिया रस्त्याने येताना दिसल्या. त्याने त्यांच्या समोर एक रत्न फेकले. ते रत्न पाहिले मात्र दोन्ही स्त्रिया 'माझे माझे' म्हणत भांडत बसल्या आणि निघून गेल्या. त्याच्याकडे एकीनेही पाहिले नाही. राजा कपाळाला हात लावून बसला.

त्यानंतर दोन माणसे आली. राजाने दुसरे रत्न फेकले. ते देखील भांडत निघून गेले. काही काळाने दोन तरुण आले. राजाच्या मनात आशा पालवली. त्याने तिसरे रत्न त्यांच्या पुढे फेकले. पण ते देखील भांडण करीत निघून गेले. राजाकडे कोणी पाहिले नाही. राजा खूप चरफडला. मनाशी म्हणाला,

'रत्ने फेकून देखील कोणी माझ्याकडे पाहायला तयार नाही. आता दगड मारून एखाद्याचे टाळकेच फोडतो!'

तेवढयात रस्त्याने एक तरुण येताना दिसला. राजाने नेम धरून त्याला दगड मारला. त्याबरोबर 'कोण आहे रे दगड मारणारा?' असे ओरडून तो तरुण राजाकडे पाहत धावून आला. राजा मनात हसून म्हणाला, 'रत्ने फेकली तर कुणी पाहिले नाही. दगड फेकून मारला की हा शोधत आला!'

ईश्वर सुख देतो तेव्हा त्याच्याकडे वळून बघायला माणसाला वेळ नसतो. मात्र तो जेव्हा दुःख देतो तेव्हा माणूस त्याचाच शोध घेत बसतो. दुःखनिवृत्तीसाठी त्याला ईश्वराचा आधार लागतो. परस्परांमध्ये प्रेमभाव वाढला तर समाजाचे कल्याणच होणार आहे. प्रेमामुळेच एकमेकांशी संवाद साधला जाईल. दुर्जनांची मने स्वच्छ होऊन समाजातील दुरिते दूर होतील. प्रेमाने जे कार्य होते ते द्वेष करून होत नाही.

प्रेमभावनेनेच शत्रूवर विजय मिळवता येईल. शत्रूचा नाश झाला

तरी शत्रुत्व संपत नाही. ते पिढ्यान्‌पिढ्या धुमसत राहते. जोपर्यंत मनात शत्रुभावना जिवंत आहे तोपर्यंत शत्रुत्व मरणार नाही.

मन शुद्ध झाले म्हणजे व्यक्तीचे चारित्र्य शुद्ध होते. म्हणून माणसाची प्रेमभावना जागी करणे हे सामाजिक स्थैर्यासाठी व शांततेसाठी आवश्यक आहे. आधुनिक काळात बाह्य अवडंबर अधिक झाले आणि 'अंतरंग' मात्र सुकून गेले. शरीराच्या बाह्य सजावटीत लोकांना अधिक रस असून अंतरंगाची सजावट करायला त्यांना वेळ मिळत नाही. खरे सौंदर्य म्हणजे मनाचे सौंदर्य. प्रेम, उदारता आदी गुणांची जोपासना करणे म्हणजे मनाचे सौंदर्य वाढवणे होय. केवळ शरीराचे कोडकौतुक करणे म्हणजे झाडाच्या मुळांना पाणी न घातला त्याच्या खोडावर, फांद्यांवर पाणी शिंपणे. मनाचे सौंदर्य हे व्यक्तित्वाचे सौंदर्य असून मनाची कुरूपता ही व्यक्तिमत्व कुरूप असल्याचे सिध्द करते. मन अधिक सद्‌गुणसंपन्न झाले तर त्याच्या कृतीतून सद्‌गुण बाहेर प्रकटतात. म्हणून भक्तिमार्ग हा मन सुंदर करणारा उपाय आहे.

भक्तिचे श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन हे नवविध प्रकार मनाचे सौंदर्य वाढविणारे आहेत. बाह्यसौंदर्य हे क्षणिक आहे, तर अंतरंगसौंदर्य जन्मजन्मांतरी टिकणारे आहे. शरीराच्या सौंदर्याने ईश्वराचा अनुग्रह होत नाही. परंतु अंतरंगसौंदर्याने त्याचा अनुग्रह होतो. म्हणून बाह्यसौंदर्यापेक्षा अंतरंग सौंदर्याकडे साधकाने आणि सामान्य व्यक्तीने अधिक लक्ष दिले पाहिजे. सद्‌गुणांनी व्यक्तिमत्व बहरून गेले की त्याच्या सुगंधाने वातावरण दरवळून जाते.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# शिव भावाचा भुकेला

जिज्ञासू सद्भक्तांनो,

ईश्वराचे प्रेम हे दिव्य प्रेम असते. त्याच्या प्रेमाला जो पात्र ठरतो त्याला भक्त म्हणतात. भक्ताची जात पाहून त्याच्यावर ईश्वर प्रेम करीत नसतो तर त्याच्या अंतःकरणातील भक्ती पाहून करतो. ईश्वर पूजा, पदार्थ यांचा भुकेला नसून शुद्ध भावाचा भुकेला आहे. वीरशैव संतकवी लक्ष्मण म्हणतात :

पत्र पुष्प अथवा जळ। तेणे तृप्त जाश्वनीळ॥
शुध्द भावाचा भुकेला। सखा भाविकाचा झाला॥

म्हणून ब्राह्मण असो अथवा अंत्यज असो, ज्याचे मन भक्तिबहळ आहे तोच शिवाला अत्यंत प्रिय होतो. शिवाच्या दृष्टीत सर्व भक्त सारखेच असतात.

श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन असे भक्तीचे नऊ भेद 'सिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहेत.

श्रवणं कीर्तनं शंभोः स्मरणं पादसेवनम्।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥९-२॥

अशी ही नवविधा भक्ती पुण्यवान लोकांकडून सहज घडते तर पातकी मनुष्याला ती दुर्लभ असते. शिवकथा, शिवशास्त्र, गुरूपदेश यांचे श्रद्धापूर्वक श्रवण करणे ही 'श्रवणभक्ती' होय. शिवस्तोत्राचा पाठ करणे, शिवाचे गुणगान करणे याला 'कीर्तनभक्ती' म्हणतात. शिवाचे ध्यान करणे ही 'स्मरणभक्ती' तर गुरूंचे चरणसंवाहन करणे म्हणजे 'पादसेवन!' बाह्य उपचारांनी इष्टलिंगाची वा मूर्तीची पूजा करणे ही 'अर्चनभक्ती' तर नम्र

होऊन नमस्कार करणे ही 'वंदनभक्ती' होय. ईश्वराचे आपण सेवक आहोत असा भाव अंगी बाणवणे म्हणजे 'दास्यभक्ती', ईश्वराला सखा मानणे म्हणजे 'सख्यभक्ती', तर ईश्वराला सर्वस्व अर्पण करणे अर्थात् आत्मसमर्पण करणे म्हणजे 'आत्मनिवेदन' होय. यांपैकी प्रत्येक भक्ती ही पूर्ण आहे. कोणत्याही एकीचा स्वीकार केला तरी ईश्वरापर्यंत जाता येते. परीक्षिताने श्रवणभक्ती, नारदाने कीर्तनभक्ती, लक्ष्मीने पादसेवन, हनुमंताने दास्यभक्ती तर अर्जुनाने सख्यभक्ती करून सद्गती मिळविली, असे भक्तिशास्त्रात म्हटले आहे.

नवविधा भक्तीचा अंगीकार केल्यामुळे वीरशैवांना आणि वीरमाहेश्वरांना एकाच जन्मात मुक्ती मिळते, असे 'वीरागमा'त म्हटले आहे :

एकेन जन्मना मुक्तिर्वीराणां तु महेश्वरि

नवविधा भक्तीचे 'सांगा' आणि 'न्यूना' असे दोन प्रकार आहेत. नवविधा भक्ती जेव्हा देहात आणि मनात सक्रिय असते तेव्हा ती 'सांगा' म्हणजे पूर्ण भक्ती असते आणि तिच्यात न्यूनता असते तेव्हा ती 'न्यूना' म्हणजे अपूर्ण भक्ती असते. वंदन याचा अर्थ नमस्कार. ही अहंकार हळूहळू कमी करण्याची प्रक्रिया आहे. नमस्काराने अहंकार दूर होतो आणि अहंकार गेल्याशिवाय दास्यभाव अंगी बाणत नाही. नमस्काराचे एकांग, त्र्यंग, पंचांग व साष्टांग असे चार प्रकार आहेत. केवळ मस्तक टेकवणे म्हणजे एकांग नमस्कार. दोन्ही हात जोडून व मस्तक झुकवून केला जाणारा नमस्कार त्र्यंग म्हटला जातो. यात तीन अंगे टेकविली जातात. दोन्ही गुडघे टेकवून व दोन्ही हात जुळवून मस्तक झुकविणे याला पंचांग नमस्कार म्हणतात आणि दोन पाय, दोन हात, पोट, छाती, मस्तक व मन ही आठ अंगे झुकवून केलेला नमस्कार 'साष्टांग' होय.

नमस्कार करणे म्हणजे नम्र होणे. ज्ञानी पुरुष हा सदैव विनम्र असतो. फळांनी वृक्ष लहडला की तो खाली झुकतो तसा ज्ञानी नम्र असतो, तर अज्ञानी पुरुष ताठ वृक्षाप्रमाणे अहंमन्य असतो. ज्याला अहंकारशून्य व्हायचे असेल त्याने नम्र व्हायला शिकले पाहिजे. गुरू, माता, पिता, वृद्ध इत्यादींना नमस्कार केला तर मनुष्य नम्र होतो आणि आयु, विद्या, यश, बळ यांची त्याला प्राप्ती होते :

अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः।
चत्वारि तस्य वर्धन्ते आयुर्विद्यायशोबलम्॥

मृकण्डू मुनींना पुत्र झाला. त्याचे नाव 'मार्कण्डेय' असे ठेवले. नामकरणाच्या वेळी अनेक महर्षी आले होते. त्यांना अंतर्ज्ञानाने समजले की मार्कण्डेयाचे आयुष्य फक्त पाच वर्षे आहे. त्यानंतर त्याचा मृत्यू होणार. महर्षींनी सल्ला दिला की मार्कण्डेयाला थोरामोठ्यांना नमस्कार करायला सांगा. त्याप्रमाणे समज येताच मार्कण्डेय वडिलधाऱ्यांना नमस्कार करू लागला.

अशी पाच वर्षे उलटली. मार्कण्डेयाचा मृत्युकाळ समीप आला. तेव्हा महर्षींनी त्याला ब्रह्मदेवासमोर नेले. मार्कण्डेयाने नमस्कार करताच ब्रह्मदेवांनी आशीर्वाद दिला :

'चिरंजीव भव !'

आशीर्वाद ऐकून महर्षींना आश्चर्य वाटले. ते म्हणाले :

'देवा, याचे विधिलिखित तर वेगळे आहे. आता याचा मृत्यू समीप आला आहे. असे असताना तुम्ही 'चिरंजीव भव' आशीर्वाद कसा दिला ?'

ब्रह्मदेव हसून म्हणाले,

'जेव्हा याच्या ललाटावर मृत्युकाळ लिहिला तेव्हा वेळ वेगळी होती. आता आशीर्वाद देतो ही वेळ वेगळी आहे. तेव्हा मागील कर्माने मृत्यू निश्चित होता. पण आता वडिलधाऱ्यांना सतत वंदन केले या कर्माने तो चिरंजीव झाला आहे.'

नमस्कार केल्यामुळे आपले आयुष्य वाढते तर आपल्या कर्माने ते घटते. म्हणून नमस्कार अवश्य करावा. भक्ती बाह्य व आभ्यंतर भक्ती अशी दोन प्रकारची असते. बाह्य उपचारांनी इष्टलिंगाची पूजा करणे ही बाह्यभक्ती तर मनात सदैव शिवचिंतन करणे ही आभ्यंतरभक्ती होय. शरीर, वाणी व मन या त्रिकरणांनुसार कायिक, वाचिक व मानसिक असेही भक्तीचे तीन प्रकार मानतात. शिवाचे पूजन करणे ही कायिक, शिवनामाचा जप करणे ही वाचिक आणि शिवचिंतन करणे ही मानसिक भक्ती होय. वीरशैव सिद्धान्तात तप, कर्म, जप, ध्यान व ज्ञान अशी भक्तीची पाच अंगे मानली असून याला 'शिवपंचयज्ञ' असे म्हटले आहे.

शिवपूजेची सामग्री संपादन करण्यासाठी देह झिजवणे म्हणजे 'तप'. शिवपूजन करणे हे 'कर्म'. शिवपंचाक्षर मंत्र, प्रणव व रुद्राध्याय आदींचा अभ्यास हाच 'जप' होय. शिवरूप, शिवलिंग इत्यादीचे चिंतन म्हणजे 'ध्यान' आणि शिवागमांपासून प्राप्त होणारे ज्ञान हेच 'ज्ञान' होय. भक्ती करणाऱ्याचे जीवन कृतार्थ होऊन तो मोक्षाचा अधिकारी होतो. भक्तिमार्ग स्वीकारून भक्त ईश्वराच्या दिशेने एक पाऊल टाकतो तेव्हा ईश्वरी अनुग्रहाने भक्तीचा उदय होतो आणि भक्तीमुळे ईश्वराचा अनुग्रह होतो. भक्ती जशीजशी वृद्धिंगत होईल, तसतसा ईश्वर भक्ताच्या अधिक समीप येतो. आणि मग मन्मथस्वामींनी वर्णिलेली

माझे जीवीचे जीवन। देव पार्वतीरमण॥
चित्त जडले त्याचे पायी। आता दूजे नेणो काही॥
अवघा आनंदाचा काळ। पोटी भरला जाश्वनीळ॥

अशी सुखाला अंतपार नसलेली आणि जीवनाला अपार अर्थ लाभलेली भावावस्था भक्ताला प्राप्त होते.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# समरसपूजा

जिज्ञासू सद्भक्तांनो,

पूजेचे दोन प्रकार आहेत. उपचारपूजा आणि समरसपूजा. पूजा द्रव्य इत्यादी उपचारांनी उपासक आणि उपास्य वेगळे आहेत या भेदबुद्धीने जी पूजा केली जाते ती औपचारिक पूजा आहे. तर 'मी लिंगरूपच आहे' या अभेदभावनेने केली जाणारी इष्टलिंगाची पूजा ही समरसपूजा होय. स्त्री घरातील सर्वांची सेवा करते ती औपचारिक असते. परंतु पतीची सेवा मात्र समरस होऊन करते, म्हणून ती समरससेवा असते. त्याप्रमाणे पाण्यात पाणी आणि दुधात दूध एकरूप व्हावे तसे इष्टलिंग म्हणजे शिव आहे आणि मी शिवरूप आहे या समरसभावनेने केली जाणारी इष्टलिंगपूजा ही समरसपूजा होय. वीरशैव-सिद्धान्तात जो 'पति-सतिभाव' सांगितला त्याचा हाच अर्थ आहे.

इष्टलिंग हे परब्रह्माचे प्रतीक असून त्याची पूजा केली म्हणजे सर्व देवतांची पूजा केल्यासारखी आहे. लिंगात सर्व जग सामावले आहे. व्यष्टीचे ज्ञान झाले म्हणजे समष्टीचे ज्ञान होते. मातीचे एक ढेकूळ म्हणजे काय याचा अभ्यास केला तर पृथ्वी म्हणजे काय ते कळते. म्हणून इष्टलिंगोपासना ही समष्टि-उपासनाच आहे. इष्टलिंग ही ब्रह्मांडाची प्रतिकृती असून त्याच्यावरून साधकाची दृष्टी विचलित होऊ नये, यासाठी वीरशैवाने अन्य देवतेची उपासना करू नये असे 'सिद्धान्तशिखामणी'त सांगितले आहे. वीरशैवाने दुसऱ्या देवतेचे दर्शन घेताना आपल्या गळ्यातील इष्टलिंग एका हाताने धरून नमस्कार केला पाहिजे. वीरशैवांची निष्ठा ही इष्टलिंगावरच असायला हवी.

ईश्वर हा एकच असला तरी ज्या स्वरूपात त्याची उपासना आपण स्वीकारली त्याच स्वरूपात ती निष्ठेने केली पाहिजे. शेतात विहीर खोदताना एकाच ठिकाणी पन्नास फूट खोल खोदले तर पाणी लागते. पन्नास ठिकाणी एकेक फूट खोदले तर पाणी कसे लागणार? त्याप्रमाणे आपल्या सर्व चित्तवृत्ती ईश्वराच्या एकाच रूपाच्या दिशेने एकवटल्या तर त्याचे फळ

मिळते. साधना सफल होते. म्हणून एकदेवतार्चन अत्यंत फलदायी आहे.

आपल्या इष्टदेवतेवर निष्ठा असावी, परंतु अन्य देवतांची निंदा करू नये. आपल्या इष्टदेवतेची निंदाही ऐकू नये. शिवलिंग, शिवभक्त यांच्यावर कोणतीही विपत्ती आली तर शिवभक्ताने आपले प्राण पणाला लावून त्यांचे रक्षण करावे. शिवनिंदकाचा शिरच्छेद करावा अथवा त्याला शाप देऊन निघून जावे, असे 'सिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. शिरच्छेद करावा याचा निंदकाचे मतपरिवर्तन करावे असा अर्थ घेतला पाहिजे. शिवभक्ताने भक्तिशून्य मनुष्याला स्पर्श करू नये, त्याच्याकडे पाहू नये, त्याच्या सहवासात राहू नये. रोग्याच्या सहवासात राहिल्यामुळे रोगसंसर्ग होण्याची शक्यता असते तसा भक्तिशून्य भवीच्या सहवासाने भक्तीचा ऱ्हास होऊन दुष्टवृत्तींचा संसर्ग होण्याची शक्यता असते. म्हणून जे सजातीय, आचारानुकूल शिवभक्त आहेत अशांच्याच घरी शिवभक्ताने भोजन घ्यावे, इतरांच्या घरी घेऊ नये :

स्वमार्गाचारनिरता: सजातीया द्विजास्तु ये।
तेषां गृहेषु भुंजीत नेतरेषां कदाचन॥९-२९॥

शिवाचारसंपन्न घरातच आपली मुलगी द्यावी आणि अशाच घरातील मुलगी आपल्या घरी आणावी. असे केले तर श्रद्धा भंगत नाही.

दीक्षेनंतर साधकाने पूर्वायुष्यातील हीन आचरणाचा त्याग केला पाहिजे. अन्यथा त्याची काहीच प्रगती होणार नाही.

चार मद्यपी भरपूर ढोसून दुसऱ्या गावी जायला निघाले. नावेत बसून जलमार्गाने प्रवास करायचा होता. रात्रभर नावेत बसून वल्ही मारली तर सूर्योदयापूर्वी गावी सहज पोहोचू असा त्यांचा हिशेब होता. भेलकांडत, स्वत:ला सावरत ते चौघे कसेबसे नावेत बसले. आळीपाळीने वल्हवीत प्रवास करू लागले.

रात्र संपत आली, पहाट झाली. तरी गाव दिसेना. गार वाऱ्याने एकजण शुद्धीवर आला. तेव्हा त्याला दिसले की नाव काठावर खुंटीला बांधून ठेवलेली आहे. रात्री नशेत नाव सोडायला विसरलो. रात्रभर प्रवास करूनदेखील आपण त्याच जागी आहोत. थोडीदेखील प्रगती झाली नाही.

मद्यप्यांना परिश्रम झाले, परंतु त्यांची प्रगती मात्र झाली नाही.

तसे साधकाने दीक्षा घेतल्यानंतर पूर्वीचे आचरण चालूच ठेवले तर त्याची परमार्थात प्रगती होणे असंभव. म्हणून नुसती दीक्षा घेणे उपयोगाचे नाही, त्यासोबत पूर्वाचरणाचा त्याग करायला हवा.

जननसूतक, मरणसूतक, रज:सूतक, जातिसूतक व उच्छिष्टसूतक ही पंचसूतके असून इष्टलिंगपूजेसाठी वीरशैव-सिद्धांताने ती अमान्य केली आहेत. इष्टलिंगपूजा हे नित्यकर्म असल्यामुळे त्याला बाधा येऊ नये लिंगपूजेत स्त्रियांना पुरुषाइतकाच अधिकार आहे. त्यांना नित्यकर्मापासून वंचित करू नये. पूर आलेल्या नदीत स्नान करू नये असे शास्त्र म्हणते, परंतु पूर आलेल्या गंगेत स्नान करायला मात्र प्रतिबंध करीत नाही. त्याप्रमाणे व्यवहारात सुतकांचे पालन होत असले तरी पवित्र अशा इष्टलिंगार्चनात ते पाळण्याची गरज नाही. इष्टलिंगपूजा हीं व्यक्तीपुरती आहे. तेथे सर्व समाजाला स्थान नाही. परंतु समाज एकत्र यावा यासाठी मठ-मंदिरांची निर्मिती झाली आहे. मठ आणि मंदिरे ही सार्वजनिक जीवनाचा आधार आहेत.

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# 'वंद्य पाऊल गुरूचे'

जिज्ञासू सद्भक्तांनो,

वीरशैव सिद्धांतानुसार गुरूची पूजा ही शिवाचीच पूजा आहे. तत्त्वत: शिव आणि गुरू यांच्यात भेद नाही. रूपे दोन असली तरी ते एकच आहेत.

एकत्वात् तत्त्वरूपत: ॥९-५१॥

शिवभक्ताने शिवावर जेवढी श्रद्धा ठेवावी तेवढीच गुरूवरही ठेवावी. शिव अप्रकट आहे. तो मायाशक्तीने युक्त असल्यामुळे दिसत नाही. परंतु तोच गुरुरूपाने प्रकट झाला आहे. म्हणून गुरू हा प्रत्यक्ष शिवच होय.

अप्रत्यक्षो महादेव: सर्वेषामात्ममायया।
प्रत्यक्षो गुरुरूपेण वर्तते भक्तिसिद्धये॥९-५३॥

गुरू आणि लिंग हे एकरूपच होत. पातळ तूप थिजले तर त्याच्या तूपपणात थोडाच कमीपणा येतो? कापूर आकारयुक्त दिसत असला तरी तो मुळात सुगंधच आहे.कापराच्या रूपाने निराकार सुगंध साकार झाला एवढेच.
मन्मथस्वामी 'परमहस्या'त म्हणतात:

कापूर आकार दिसे रवा। परि तो परिमळचि आघवा ।
तसा लिंगरूपे जाणावा। गुरूचि आकारला॥

शिव परब्रह्म आहे. परंतु त्याच्याशी भेटणे, बोलणे घडत नाही. त्या निराकाराची पूजा करता येत नाही.आपल्या संकटकाळात तो आपले सांत्वन करीत नाही. परंतु गुरू मात्र आपल्याला भेटतो, आपल्याशी बोलतो.

त्याची पूजा करता येते, संकटकाळात तो आपले समाधान करतो. म्हणून शिवापेक्षांही गुरू हा अधिक आहे. परंतु तो परब्रह्म आहे याचा मात्र विसर पडू नये. मन्मथस्वामींनी म्हटले आहे :

गुरू माणूस न भाविजे विश्वासे। तयासी स्वये ज्ञानप्रकाशे।
मग आपणही होय गुरुरूप सरिसे। गुरुध्याने॥

ज्याच्या केवळ कृपाकटाक्षाने परशिवाचे ज्ञान होते असा गुरू जगात अत्यंत पूज्य मानला जातो. 'साक्षात् भर्गो नराकृतिः' असे वेदवचन असून गुरु हा नररूपातील शिवच होय हा त्याचा अर्थ आहे. म्हणून शिवज्ञानाचा सागर असलेल्या श्रीगुरूची देह, वाणी आणि मन अशा त्रिकरणांनी सेवा करावी. त्याच्या आज्ञेचे उल्लंघन कधीही करू नये. गुरूच्या आज्ञेचे उल्लंघन म्हणजे प्रत्यक्ष शिवाच्या आज्ञेचे उल्लंघन होय.

गुरोराज्ञां न लंघेत सिद्धिकामो महामतिः
तदाज्ञालंघनेनापि शिवाज्ञाच्छेदको भवेत्॥९-५७॥

एक शिष्य गुरूकडे अध्ययनासाठी गेला. तो मुलखाचा आळशी होता. एकेदिवशी गुरूने त्याला पाणी भरण्याची आज्ञा केली. तेव्हा हात जोडून तो नम्रतेने म्हणाला,

'गुरुदेव, आपल्या आज्ञेचे उल्लंघन मी केले नसते. परंतु मला पाण्यापासून भय आहे असे एका ज्योतिष्याने सांगितले आहे. म्हणून मी पाणी भरू शकत नाही.'

हे ऐकून गुरूने स्वतः निमूटपणे पाणी भरले. एकदा गुरूने त्याला बेलपाने तोडण्यास सांगितले. तेव्हा शिष्य नम्रतेने म्हणाला,

'गुरुदेव, मला पाण्यापासून जेवढे भय आहे तेवढेच झाडापासून देखील आहे, असे ज्योतिषाने सांगितले आहे. तेव्हा मला शक्य होणार नाही.'

गुरूने स्वतः बेलपाने तोडली. असे प्रत्येक वेळी गुरूने काही काम सांगितले की शिष्य काहीतरी सबब सांगून ते टाळायचा. एकदा गावातून एक भक्त आला आणि गुरूला म्हणाला, 'आमच्या घरी आज

आपल्या एखाद्या शिष्याला जेवायला पाठवा!'

शिष्याने हे ऐकले. त्याच्या मनात चलबिचल झाली. गुरूने विचार केला की, हा आळशी शिष्य आपले कोणतेच काम ऐकत नाही. हे काम तरी कशाला करील? दुसऱ्या शिष्याला पाठवावे. असा गुरू विचार करीत आहे तोच आळशी शिष्य म्हणाला,

'गुरुदेव, आपण भोजनाला जाण्याची आज्ञा मला करावी. मी तिचे कदापि उल्लंघन करणार नाही. भोजनापासून मला भय नाही असे ज्योतिषाने सांगितले आहे.'

शिष्य कसा नसावा याचे हे उदाहरण आहे. आपल्याला अनुकूल आज्ञा पाळणे आणि प्रतिकूल वाटणारी टाळणे हे याला गुरूची आज्ञा पाळणे म्हणत नाहीत. गुरू सांगेल ते काम नि:संदेह बुद्धीने करणे याला गुर्वाज्ञेचे पालन म्हणतात.

उभयं म्हणजे दोन. इष्टलिंग व गुरू या दोन्हीवर समान निष्ठा ठेवणे म्हणजे उभयस्थळ होय. शिव हा गुरू असला तरी शिवापेक्षाही गुरूरुप श्रेष्ठ आहे, असे 'सिद्धान्तशिखामणी'त म्हटले आहे. स्वाती नक्षत्रातला पाऊसथेंब शिंपल्यात पडला तर त्याचा मोती होतो आणि इतरत्र पडलेला पाऊन वाहून जातो. त्याप्रमाणे गुरूपदेश शिष्यरूपी शिंपल्याने स्वीकारला तर तेथे शिवज्ञानरूपी मोती तयार होतो. ईश्वराच्या उपासनेने ऐश्वर्यप्राप्ती होते, परंतु गुरूच्या उपासनेने मोक्षप्राप्ती होते. कदाचित शिवाची अवकृपा झाली असेल तर श्रीगुरूच्या अनुग्रहाने त्याचे निराकरण होते.

शिव हा भक्ताला प्रत्यक्ष भेटत नाही. परंतु गुरू मात्र प्रत्यक्ष भेटतो. त्याच्याशी बोलतो व त्याच्या शंकांचे समाधानही करतो. गुरूला माता-पिता असे म्हणतात. जन्मदाते माता-पिता पुत्राला सांसारिक मोहात पाडतात. परंतु मातृपितृरूप श्रीगुरू मात्र त्याची मोहपाशातून सुटका करतो. अग्नीच्या संपर्काने सोने शुध्द होते त्याप्रमाणे गुरूच्या सान्निध्याने भक्त सर्व दोषांपासून मुक्त होतो. देवयात्रा, गुरुयात्रा व तीर्थयात्रा असे यात्रेचे तीन प्रकार आहेत. त्यात गुरुयात्रा ही श्रेष्ठ मानली जाते. कारण गुरुयात्रेत विचारांचे आदान-प्रदान होते, अज्ञानाचा नाश होतो आणि शिष्याच्या हृदयात ज्ञानाचा उदय होतो. असे इतर यात्राप्रकारांत घडत नाही. सूर्याचे ऊन पाठीवर घ्यावे आणि अग्नीकडे तोंड करून शेकावे असे म्हणतात. म्हणजे ऊन व अग्नी यांचा स्वीकार अंशत: व बंधने पाळून करावा. परंतु श्रीगुरूचे

सेवन मात्र सर्वभावे करावे.

हा श्रीगुरु कसा? मन्मथस्वामी आपल्या 'परमरहस्या'त म्हणतात:

जेणे कैवल्याचे कैवल्य केले। रंकासी राजेपण दिधले।
जीवासी शिवपदी बैसविले। जया गुरुनाथे॥
शेखी शिवत्वही नेले। निर्गुणत्व जेणे दिले॥

कैवल्याचे कैवल्य भरणारा, रंकाला राजेपण देणारा, जीवाला शिवपदी बसविणारा आणि शिवत्वभाव देखील संपवून निर्गुणत्व देणारा असा हा गुरू. शिष्यासाठी गुरुपरते अन्य दैवत असत नाही. म्हणूनच ते म्हणतात:

सार सकळ तीर्थांचे। वंद्य पाऊल गुरूचे॥

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# त्रिविध संपत्ती

जिज्ञासू सद्भक्तांनो,

भक्ती ही संपत्ती असून ती तीन प्रकारची आहे. गुरू, लिंग आणि जंगम यांच्या भक्तीला 'सिद्धान्तशिखामणी'त त्रिविध संपत्ती असे म्हटले आहे. सामान्य माणसे शेत, घर, पैसा यांना संपत्ती म्हणतात. पण खरे तर ही लौकिक संपत्ती विपत्तीच अधिक देते. संपत्ती म्हणजे जी सुख देते ती. ज्याला आपण संपत्ती म्हणतो ती दुःखच अधिक देते. चिंता करायला लावते. परंतु यापेक्षाही एक वेगळी संपत्ती आहे. ती सदोदित शाश्वत सुख देते. ती म्हणजे भक्ती. ही भक्तीच गुरू, लिंग, जंगम यांकडे वळते तेव्हा ती त्रिविध संपत्ती होते. वीरशैवांची ही अक्षय संपत्ती आहे. तिच्यामुळे मिळणारा आनंद देखील अक्षय असतो. गुरूवंदन, लिंगार्चन, जंगमाची सेवा यामुळे अक्षयस्वरूपी आनंद मिळतो. हा आनंद सोने, चांदी इत्यादी धातूंपासून मिळणाऱ्या आनंदापेक्षा अतिशय उत्कट असतो. म्हणून गुरु, लिंग, जंगम ही त्रिविध संपत्ती आहे. या संपत्तीमुळे विपत्ती नव्हे तर मुक्ती लाभते.

शिव एकच असला तरी त्या परशिवचैतन्याची ही तीन रूपे मानली आहेत. विश्वप्रकाशक परशिव म्हणजे आपणच आहोत अशा शिवज्ञानाने संपन्न असलेला शिवयोगी हाच जंगम होय :

जानन्त्यतिशयाद्येतु शिवं विश्वप्रकाशकम्।
स्वस्वरूपतया ते तु जंगमा इति कीर्तिताः ॥११-३६॥

जंगम म्हणजे चरलिंग अर्थात् चालते बोलते लिंग. लिंगाचे जंगम व अजंगम असे दोन भेद असून मृत्तिका, शिला इत्यादीपासून निर्मिलेले लिंग हे अजंगम लिंग आहे आणि शिवज्ञानसंपन्न शिवयोगी हे जंगम लिंग आहे. वीरशैवाने अजंगम लिंगाइतकीच जंगम लिंगाचीही भक्ती केली पाहिजे. परंतु व्यवहारात असे दिसते की, अजंगम लिंगासारखे जंगम

लिंगाचे अर्चन केले जात नाही. याचे कारण, अजंगम लिंगाचे कसेही पूजन केले तरी त्याची काही प्रतिक्रिया होत नाही आणि जंगम लिंगाकडून दोष दाखविले जातात, हे असावे. दोष दाखवले म्हणजे अहंकार दुखावतो आणि अहंकार दुखावला म्हणजे अवज्ञा करण्याची प्रवृत्ती होते. लिंगापेक्षा जंगमाला अधिक महत्त्व दिले जाते. कारण लिंगात मंत्रसंस्काराने शिवाचा निवास होतो तर जंगमाच्या ठिकाणी शिव सदोदित असतो :

अचरे मंत्रसंस्काराल्लिंगे वसति शंकरः।
सदाकालं वसत्येव चरलिंगे महेश्वरः॥९-६२॥

शिवयोगी अशा जंगमाला केलेले दान अक्षय फलदायी होते. शिवयोग्याचा अवमान केल्यास दुर्गती प्राप्त होते. म्हणून गुरू व लिंग यांच्याप्रमाणेच जंगमालाही साक्षात् शिव मानून त्याचे आदरपूर्वक पूजन करावे. वीरशैव संतकवी मन्मथस्वामी म्हणतात :

वाणू नये गुणदोष। जंगमवेष पाहिल्या॥
शंकर ऐसा भावोनि मनी। श्रेष्ठासनी बैसवावा॥
भावे करावे पूजन। यथाशक्ती द्यावे अन्न॥
पुसू नये यातिकुळ। त्याचे मूळ शोधू नये॥
मन्मथ म्हणे ऐसे यात। साधन बहुत साटोपे॥

जंगम हा शिवरूप असल्याने त्याच्या ठिकाणी विश्वात्मभाव अर्थात् समष्टिभाव असतो, स्वार्थभाव नसतो. गुरू हा दीक्षादी संस्कार करून जीवात्म्याला परिशुद्ध करतो तर जंगम हा परिशुद्ध जीवाला शिवज्ञानाचा उपदेश करून त्याला शिवरूप करतो. जंगम ज्ञानोपदेश करीत सतत परिभ्रमण करीत असतो. वाहणारे पाणी आणि चालणारा साधू हे नेहमी शुद्ध असतात. त्याप्रमाणे सतत भ्रमण करणारा जंगम हा निर्मोही व ज्ञानी असतो. एकाच ठिकाणी अधिक काळ निवास केला तर त्या स्थानाविषयी वा व्यक्तीविषयी आसक्ती निर्माण होऊ शकते, म्हणून ज्ञानी पुरुषाने सतत भ्रमण करावे असे शास्त्र म्हणते. जन्मलेल्या बाळाला पूर्वजाचे नाव ठेवण्याची प्रथा आपल्या देशात आहे. ज्याने आपले साठसत्तर वर्षांचे आयुष्य एका

घरात काढले त्याची त्या घराबद्दल आसक्ती असणे स्वाभाविक आहे. म्हणून आजोबानेच नातवाच्या रूपाने जन्म घेतला असावा, अशी समजूत आहे. अधिक काळ एका ठिकाणी राहिल्याने आसक्ती निर्माण होते म्हणून जंगमाने भ्रमत राहावे.

वीरशैवांच्या अष्टावरणांतील जंगम हे एक आवरण आहे. शिवज्ञानाचा उपदेश करून प्रपंचदुःखापासून जीवात्म्याचे रक्षण करणारा जंगम हा एक आवरण अर्थात् रक्षाकवचही आहे. शुद्ध माहेश्वरवंशीय व्यक्तींनाही संप्रदायात जंगम म्हटले जाते. जंगम वंशात पूर्वी अनेक जीवन्मुक्त महापुरुष होऊन गेले असावेत. त्यांचे माहात्म्य दृष्टिसमोर ठेवून त्यांच्या वंशजांची पूजा करण्याची प्रथा पडली असावी. म्हणून प्रत्यक्ष शिवरूप असलेल्या शिवज्ञानसंपन्न अशा जंगमाची वीरशैवांनी भक्ती करावी.

'ब्राह्मण' हा शब्द तात्त्विक दृष्टीने ब्रह्मज्ञानी पुरुषाचा वाचक असला (ब्रह्म जानातीति ब्राह्मणः) तरी व्यवहारात तो जातिवाचक देखील आहे. तसा 'जंगम' हा शिवज्ञानसंपन्न जीवन्मुक्त पुरुषाचा वाचक असला तरी व्यवहारात तो विशिष्ट जातीचा, कुळाचा निर्देश करतो. शिवाने निर्मिलेली सृष्टी ही शिवसृष्टी होय. या सृष्टीत वीर, नंदी, भृंगी, वृषभ आणि स्कंद हे पाच गणाधीश्वर आणि कालारी, पुरारी, वेदारी, स्मरारी आणि मखारी हे पाच पंचम उत्पन्न झाले. पंचम हे गणाधीश्वरांचे शिष्य होत. गणाधीश्वरांचा जो वंश तो जंगमवंश आणि पंचमांचा वंश तो पंचमवंश म्हणजे भक्तवर्ग. वीरशैवांत जंगमवंश अत्यंत पूज्य मानण्यात येतो. आजच्या काळात सर्व जंगम शिवज्ञानसंपन्न नसले तरी शिवयोगी शिवाचार्य, श्रीपती पंडिताराध्य, नीलकंठ शिवाचार्य, मायिदेव, मरितोंटदार्य, शांतलिंगस्वामी, मन्मथस्वामी इत्यादी त्यांच्या पूर्वजांनी महान सामाजिक आणि साहित्यिक कार्य केले. म्हणून त्यांच्याबद्दल पूज्यभाव बाळगला जातो. वेदांचा गंधदेखील नसणाऱ्या मनुष्याचे आडनाव द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी असे असते, त्याप्रमाणे 'जंगम' हे आज उपनाव झालेले दिसते.

स्वयजंगम, चरजंगम आणि परजंगम असे जंगमाचे तीन भेद सांगितले आहेत. जो स्वतःला सर्वत्र पाहतो अर्थात् प्राणिमात्रांत आपले स्वरूप पाहतो तो 'स्वयजंगम' होय. तो कोणावर कृपा करीत नाही की कोणाचा द्वेष करीत नाही. सर्वठिकाणी त्याची समत्वदृष्टी असते. स्वरूपज्ञानाच्या आनंदात रममाण होऊन स्वच्छंदपणे विचरण करणारा तो 'चरजंगम' होय.

तो कोणत्याही एका निश्चित ठिकाणी राहत नाही. निःस्पृह, शमदमादी गुणांनी युक्त असा हा चरजंगम दर्शन, स्पर्शन आणि शिवज्ञानोपदेश यांच्याद्वारे सर्वांचा उद्धार करतो. यालाच 'चरपट्टाधिकारी' असेही म्हणतात. पर म्हणजे श्रेष्ठ आणि जंगम म्हणजे जीवन्मुक्त. जीवनमुक्तांत जो श्रेष्ठ तो 'परजंगम' होय. परावस्था ही जीवन्मुक्तीची अंतिम अवस्था असून तिला 'तूर्यावस्था' अथवा 'परमहंसावस्था' म्हणतात. 'परं नास्ति' अर्थात् स्वतःपासून कोणी वेगळा आहे असा बोध त्याला होत नाही म्हणून तो परजंगम. त्याच्याकडून उपदेश होत नाही. परंतु त्याचे दर्शन घेऊन, त्याला स्पर्श करून मनुष्याचा उद्धार होतो. तो देहधारी असूनही विदेही असतो.

असा गुरू, लिंग, जंगम या रूपांनी एक शिवच प्रकटला आहे. भुक्ती आणि मुक्ती देण्यासाठी :

एक एव शिवः साक्षात् सर्वानुग्रहकारकः।
गुरुजंगमलिंगात्मा वर्तते भुक्तिमुक्तिदः ॥९-५९॥

गुरू, लिंग, जंगम यांच्या एकत्वाचे भान सर्व साक्षात्कारी पुरुषांना असते. म्हणूनच मन्मथस्वामी म्हणतात :

गुरू आणि लिंग जंगमाची रोवा।
देई गज देवा जन्मोजन्मी॥

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# पादजलपान करिता

जिज्ञासू सद्भक्तांनो,

जन्मजन्मांतरापासून जीवात्म्याच्या ठिकाणी अहंकार साचलेला असतो. ईश्वर आणि भक्त यांच्यामध्ये अहंकार एखाद्या पहाडासारखा उभा असतो. जोपर्यंत अहंकार दूर होत नाही तोपर्यंत ईश्वराची प्राप्ती होत नाही. गुरूसमोर शिष्य नतमस्तक होतो तेव्हा त्याच्या अहंकारनिवृत्तीचा आरंभ होतो. एकांग, त्र्यंग, पंचांग आणि अष्टांग असे चढत्या श्रेणीचे नमस्कार जेव्हा शिष्याकडून घडतात तेव्हा त्याच्या अहंकाराचे निवारण झाले आहे असे समजावे. परंतु मनात किंतु न ठेवता गुरूचे पादोदक शिष्याकडून परमादराने सेवन केले जाते तेव्हाच खऱ्या अर्थाने त्याचा अहंकार गळून पडतो. अहंकारशून्य होण्यासाठी पादोदकाचे सेवन आवश्यक आणि फलप्रद आहे. अहंकारशून्य झाल्याशिवाय लिंगांगसामरस्याची प्राप्ती होणार नाही.

पादोदकसेवनात ज्याची श्रध्दा अधिक गाढ आहे त्याला त्याचे अधिक फळ मिळते. नियमित जलसिंचनाने वृक्ष वाढत जातो, फळत जातो तसा नित्य पादोदकसेवनाने भक्तिवृक्ष वाढत जाऊन मुक्तिफळ प्राप्त होते. पादोदक हे सर्व मंगलांत मंगल, पवित्र वस्तूंत पवित्र आणि सर्वसिद्धिदायक आहे:

सर्वमंगलमांगल्यं सर्वपावनपावनम्।
सर्वसिद्धिकरं पुंसां शंभोः पादाम्बुधारणम्॥९-६८॥

•

पादोदकात हे सामर्थ्य कोठून आले? तर ज्यांनी शास्त्रविहित मार्गाने आपले सबंध जीवन व्यतीत केले अशा महात्म्यांच्या पाद, हस्त, वाणी, नेत्र किंबहुना सर्वच अवयवांत तपःशक्ती ओतप्रोत भरलेली असते. रसाने ओथंबलेल्या द्राक्षासारखे त्यांचे शरीर तपःसामर्थ्याने ओथंबलेले असते. त्यांच्या अंगस्पर्शाने आणि दृष्टिपाताने पतित लोक पावन होतात. त्यांच्या पादस्पर्शाने लाकडी खडावा देखील पूजनीय ठरतात. मग त्यांच्या पादस्पर्शाने

जल पवित्र होईल यात काय आश्चर्य? शास्त्रविहित वाटेवरच ज्यांची पावले सदैव पडतात ती पवित्र पावले होत. शिष्य सद्‌गदित होऊन श्रीगुरूचे चरणसंवाहन करीत त्यांची पादपूजा करतो तेव्हा श्रीगुरू द्रवतात आणि त्यांची करुणा त्यांच्या पायाच्या अंगठ्याव्दारे पादतीर्थात प्रविष्ट होते. वासराने गायीच्या स्तनाला मुख लावावे आणि तिचे आचळ दुधाने भरून यावे तसे. म्हणून पादतीर्थाला 'करुणाजल' असे म्हणतात.

पादोदक पापरूपी पंकाचे शोषक असून ज्ञानज्योतीचे प्रकाशक आहे. पादोदक असे विलक्षण की ते घेतल्याने संसारवृक्ष उन्मळून पडतो. सप्तसागरादी सर्व तीर्थांत स्नान केल्याने जे फळ मिळते ते गुरुपादतीर्थाच्या सेवनाने मिळणाऱ्या फळाच्या एक सहस्रांशाएवढेही नसते. काशीक्षेत्रात देहत्याग केला तर मुक्ती मिळते, परंतु गुरुपादतीर्थ न मरताच मुक्ती देते; गंगेत स्नान केल्याने मोक्ष मिळतो परंतु गंगेत बुडून मरण्याचा धोका असतो. गुरुपादतीर्थ मात्र न बुडवता तारते, अशा कल्पनांनी मन्मथस्वामींनी पादतीर्थाचे माहात्म्य गायिले आहे. ते 'परमरहस्या'त म्हणतात:

'काशी मेलिया मुक्ति देत। विश्वासे सेविता गुरुतीर्थ।
तरी साक्षात्कारे पावे मुक्त। न मरताचि॥
गंगातीर्थी एक अवगुण। खोलिये जाता जाय बुडोन।
गुरुतीर्थ न बुडविता तारण। करी भावे सेविता।

पवित्र असे पादोदक विशिष्ट पूजाविधीने सिद्ध होते. केवळ गुरूचे पाय धुतलेले पाणी पादोदक होत नाही. गुरू किंवा जंगम यांची पादपूजा करताना त्यांच्या अंगठ्यात रुद्र, तर्जनीत शंकर, मध्यमेत महादेव, अनामिकेत त्र्यंबक, कनिष्ठिकेत ईशान, पायाच्या वरच्या भागात कपर्दिक, पायाच्या तळव्यात सदाशिव, घोट्यांत रुद्र व भर्ग याप्रकारे भावना करावी. कनिष्ठिकेपासून अंगठ्यापर्यंत बोटांनी नकारापासून यकारापर्यंत (नमःशिवाय) पाच अक्षरांचा संबंध करावा. नंतर भस्म, गंध इत्यादींनी पादपूजा करावी. विधियुक्त पूजा संपल्यावर दोन्ही पायांच्या अंगठ्यांवर जलाचा अभिषेक करून खाली एका पात्रात ते साठवावे. याप्रकारे विधियुक्त पादोदक सिद्ध होते. या पादोदकाचे सर्वांनी सादर सेवन करावे.

वीरशैवाने प्रतिदिन गुरुपादोदक, लिंगपादोदक आणि जंगमपादोदक

यांचे सेवन केले पाहिजे. गुरू आणि जंगम उपलब्ध नसतील तर इष्टलिंगावरच तीन वेळा मंत्रपूर्वक जल घालून गुरुपादोदक, लिंगपादोदक, जंगमपादोदक अशा भावनेने ते सेवन करावे. गुरुपादोदक सेवन करताना जंगमपादोदकाची आणि जंगमपादोदक सेवन करताना गुरुपादोदकाची भावना करावी. जो श्रद्धेने पादोदक सेवन करतो त्याची सर्व पातके नाहीशी होऊन त्याला मातेचे स्तनपान करावे लागत नाही अर्थात् पुनर्जन्म मिळत नाही, अशी आगमांची ग्वाही आहे.

पाद म्हणजे परमानंद आणि उदक म्हणजे ज्ञान. अर्थात् 'पादोदक' म्हणजे परमानंदाचे ज्ञान असा पादोदकांचा तात्त्विक अर्थ आहे. पाद म्हणजे गुरू आणि उदक म्हणजे शिष्य असाही एक अर्थ केला जातो. वेधदीक्षेद्वारा गुरुशिष्याचा ऐक्यबोध होणे हे 'दीक्षापादोदक,' गुरुने उपदेशिलेले परमानंदाचे ज्ञान मननाने दृढ होणे हे 'शिक्षापादोदक' आणि मननाने दृढ झालेल्या ज्ञानाची निदिध्यासाने निरंतर अनुभूती येणे हे 'ज्ञानपादोदक'होय. दीक्षा, शिक्षा आणि ज्ञान ही पादोदके आत्मानुभवरुपी असून त्यांच्या प्राप्तीचे साधन बाह्य पादोदक हे आहे. मन्मथस्वामी म्हणतात.

पादजलपान करिता । मोक्ष चलढसे हाता ॥

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# 'प्रसादस्तु प्रसन्नता'

जिज्ञासू सद्भक्तांनो,

अलीकडच्या काळात माणसाची मन:स्थिती बिघडलेली दिसते. याचे कारण, अलीकडे उपभोग्य वस्तू ईश्वरार्पण न करता सेवन करतात, हे आहे. ईश्वरार्पण केलेला कोणताही पदार्थ 'प्रसाद' होतो आणि प्रसादाचे सेवन केल्यामुळेच प्रसन्नतेचा लाभ होतो. जुन्या काळी कोणतीही वस्तू घरात आणली की ती प्रथम देवापुढे ठेवली जात असे. म्हणजे प्रथम देवाला अर्पण करून नंतर प्रसाद म्हणून तिचा स्वीकार केला जात असे. नवी साडी अथवा नवीन लुगडे प्रथम देवासमोर ठेवून नंतर दुसऱ्या एखाद्या स्त्रीला धारण करायला देत असत. तिने एकदा वापरल्यानंतर मग मालकीण ते वस्त्र वापरत असे. या प्रथेत त्यागबुध्दी होती, हे आपले नाही असे मनाला समजावून अहंकार क्षीण करण्याचा प्रयत्न होता. आज असे नाही. नवे वस्त्र आणले की ते उपभोगायची प्रत्येकाला घाई. यामुळेच आज मनुष्य प्रसन्नता हरवून बसला आहे.

प्रसाद म्हणजे प्रसन्नता, दूषित वस्तूंच्या सेवनाने आपण मानसिक प्रसन्नता गमावली आहे. खोटे न बोलता, चोरी न करता अर्थार्जन करणारे लोक फार कमी आहेत. आपली वस्त्रे, अन्न, गृह सारी दूषित झालेली आहेत. त्यामुळे त्यांच्या सेवनाने मनुष्याला सुख कसे मिळेल? यासाठी उपभोग्य वस्तू कोणतीही असो, फल, पुष्प, जल, अन्न, औषध ती प्रथम शिवार्पण करून नंतर प्रसाद म्हणून स्वीकारली तरच ती सुखकारक होईल.

अशुद्ध पदार्थ शुद्ध करणे हा निसर्गाचा स्वभाव आहे. फुलझाडाला दुर्गंधीयुक्त खत दिले तरी त्याचे फूल मात्र सुगंधी होते. उसाला घाण पाणी दिले तरी उसाचा रस गोड होतो. म्हणजे दूषित वस्तूला शुद्ध करणे हा निसर्गाचा स्वभाव आहे. निसर्ग म्हणजे पंचमहाभूते आणि पंचमहाभूते म्हणजे ईश्वराचे स्थूलरूप. ज्याप्रमाणे निसर्गाला अर्पण केलेले दूषित पदार्थ शुद्ध होतात. त्याप्रमाणेच शिवाला अर्पण केलेले पदार्थ शुद्ध होऊन त्यांना

प्रसादरूप लाभते. म्हणून आपल्या सर्व भोग्य वस्तू प्रथम शिवार्पण करून नंतर प्रसाद म्हणून ग्रहण कराव्या, असे वीरशैव-सिद्धान्तात सांगितले आहे :

अर्पयित्वा निजे लिंगे पत्रं पुष्पं फलं जलम्।
अन्नाद्यं सर्वभोज्यं च स्वीकुर्याद् भक्तिमान्नरः॥ ९-७१ ॥

पान, फूल, फळ, जल आणि अन्नादी सर्व भोज्यपदार्थ प्रथम इष्टलिंगाला अर्पण करून मगच शिवभक्ताने ग्रहण करावेत, असा या श्लोकाचा अर्थ आहे.

मनाची प्रसन्नता हाच प्रसाद होय.

नैर्मल्यं मनसो लिंगं प्रसाद इति कथ्यते॥ ११-६ ॥

शिवार्पित पदार्थांना देखील 'प्रसाद' अशी संज्ञा आहे. शिवाचा अनुग्रह हा सुद्धा 'प्रसाद' म्हटला जातो. आहारशुद्धीमुळे सत्त्वशुद्धी म्हणजे मन:शुद्धी होते. सत्त्वशुद्धीमुळे दृढ स्मृती प्राप्त होते. आणि दृढ स्मृतीमुळे अविद्यारूपी हृदयग्रंथी मोकळया होतात. मन:शुद्धीला कारणीभूत असलेली आहारशुद्धी कशी होते? तर सचोटीने व्यवहार करून मिळविलेले अन्न शिवार्पित केल्यावरच शुद्ध होते.

आहार याचा अर्थ केवळ अन्न असा नसून शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंचविषय देखील पंचज्ञानेंद्रियांचे आहारच होत. दूषित अन्नसेवनामुळे जसे मन दूषित होते तसे शिवार्पित न केलेल्या पंचविषयांच्या उपभोगाने मन मोहित होऊन जीवाची भोगलोलुपता वाढीला लागते आणि तो पुन:पुन्हा संसारचक्रात भ्रमत राहतो. 'महाभारता'तील ययाती म्हणतो :

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते॥

हविर्द्रव्ये अर्पण केल्यावर अग्नी अधिकच वर्धमान होतो त्याप्रमाणे कामोपभोगाने कामाग्नी वाढतच जातो, तो शांत होत नाही. म्हणून भर्तृहरीने

'वैराग्यशतका'त म्हटले आहे की, आम्ही भोगांचा उपभोग घेत नाहीं तर भोगच आमचा उपभोग घेतात. विषयांतील विष माणसाला बाधणारच. कारण डोळ्यांनी पाहावे लागते, कानांनी ऐकावे लागते, जिव्हेने रस चाखावे लागतात, नाकाने गंध हुंगावे लागतात आणि त्वचेने स्पर्श अनुभवावाच लागतो. विष जाईल कोठे? म्हणून उपभोग घेण्याआधी विषय जर शिवार्पित केले तर त्यांच्यातील दोष दूर होऊन ते प्रसादरूप होतात. शब्द हा शब्दप्रसाद, स्पर्श हा स्पर्शप्रसाद, रूप हा रूपप्रसाद, रस हा रसप्रसाद आणि गंध हा गंधप्रसाद होतो. मग प्रसाद कसा बाधेल? तो अमृतच होणार. विषदेखील प्रसादरूप झाल्याने मीराबाईला बाधले नाही.

उपभोग्य पदार्थ भोग्य आणि धार्य असे दोन प्रकारचे असतात, अन्न, जल, इत्यादी भोग्य तर वस्त्रे, अलंकार इत्यादी धार्य पदार्थ होत. शिवभक्ताने आपले भोग्य आणि धार्य पदार्थ प्रथम शिवार्पित करून नंतर प्रसाद म्हणून त्यांचा स्वीकार करावा, असे वीरशैव-सिद्धान्तात सांगितले आहे. पदार्थ आणि प्रसाद यांमध्ये फरक आहे. मनुष्याच्या मनात 'पदार्थां'विषयी ममत्व असते. जेव्हा पदार्थ शिवार्पित होतात तेव्हा त्यातील ममत्व नष्ट होऊन 'हे पदार्थ शिवाचे, आपले नव्हेत' अशी भावना निर्माण होते. त्यावेळी 'पदार्थ' हा 'प्रसाद' होतो.

एखादा मनुष्य फळे इत्यादी पदार्थ घेऊन मंदिराकडे जात असताना जर कोणी त्याला विचारले की 'हे काय आहे अन् कोणाचे आहे?' तर तो उत्तर देतो की, 'ही अमुक फळे आहेत अन् ती माझी आहेत'. तो मंदिरातून परत येत असताना जर त्याला वरील प्रश्न विचारले तर तो सांगतो की, 'हा 'प्रसाद' आहे अन् हा शिवाचा आहे' शिवार्पित होण्याआधी पदार्थांची केळी, नारळ, साखर इत्यादी वेगवेगळी नावे असतात. परंतु अर्पणानंतर मात्र सर्व पदार्थांना 'प्रसाद' या एकाच संज्ञेने संबोधिले जाते.

'पदार्थ' स्वार्थीवृत्तीने मनुष्य एकटाच खातो तर 'प्रसाद' मात्र सर्वांना वाटून मग खातो. माणसे पदार्थभोगी झालेली आहेत, म्हणून असमाधानी आहेत. ती प्रसादभोगी झाली तर पूर्ण समाधानी होतील. गुरू, लिंग, जंगम यांना अर्पण करून प्राप्त झालेला प्रसाद अनुक्रमे शुद्धप्रसाद, सिद्धप्रसाद आणि प्रसिद्धप्रसाद असा त्रिविध आहे. शिवनिर्माल्य म्हणजे शिवाला वाहिलेले बेल-फूल. हे निर्माल्य फेकून देण्यापूर्वी मस्तकावर धारण

केले तर पौण्डरीक यागाचे फळ मिळते, असे शास्त्रात म्हटले आहे. रुद्राला वाहिलेला नैवेद्य भक्षण करावा, जल प्राशन करावे, फूल हुंगावे, असे जाबालश्रुतीत सांगितले आहे.

भुंजीयाद् रुद्रभुक्तान्न रूद्रपीतं जलं पिबेत्।
रुंद्राधातं सदा जिघ्रेद् इति जाबालिकी श्रुति: ॥ ९-७० ॥

देवस्व, देवताद्रव्य, नैवेद्य, निवेदित, चंडद्रव्य व बहि:क्षिप्त असे निर्माल्याचे सहा प्रकार आहेत. देवाच्या उद्देशाने गाव-भूमी यांचे केलेले दान म्हणजे देवस्व. सोने, चांदी यांचे देवाला केलेले दान म्हणजे देवताद्रव्य. देवासाठी तयार केलेले अन्न, जल, पुष्प, फल म्हणजे नैवेद्य. नैवेद्य देवाला अर्पण केल्यावर त्यालाच निवेदित म्हणतात. स्थावरलिंगाला देव, दानव, मानव यांनी अर्पण केलेल्या द्रव्य, अन्न इत्यादी पदार्थांवर चंडेश नामक गणाचा अधिकार असतो म्हणून ते चंडद्रव्य आणि भूतपिशाचासाठी बाहेर फेकलेल्या अन्नादी द्रव्याला बहि:क्षिप्त म्हणतात. यांपैकी देवस्व, देवताद्रव्य व नैवेद्य देवांसाठीच असल्यामुळे ते स्वीकारण्याचा इतरांना अधिकार नाही. चंडद्रव्य आणि बहि:क्षिप्त यांचा स्वीकार कोणीही करू नये. उरलेले निवेदितनिर्माल्य शिवभक्त नसलेल्यांना निषिद्ध असून शिवभक्तांना मात्र स्वीकरणीय आहे. ते त्यांना पुण्यकारक असून त्यांना कोणताही दोष लागत नाही. म्हणून शिवभक्ताने शिवनिर्माल्य अवश्य ग्रहण करावे. प्रसाद म्हणजे शुद्ध झालेले अन्न. त्याच्या सेवनाने देह शुद्ध होतो आणि मनही शुद्ध होते. म्हणून गुरुप्रसादाबद्दल वीरशैव संतकवी लक्ष्मण म्हणतात :

गुरुप्रसादाची थोरी। महिमा असे श्रेष्ठ भारी॥
सुख ब्रह्मानंदी होय। गगनी आनंद न माय॥
लक्ष्मण म्हणे घ्या हो। जन्ममृत्यू चुकवा हो॥

॥ ॐ शांति: शांति: शांति: ॥

# ‘ दान धर्म का मूल ’

जिज्ञासू सद्‌भक्तांनों,

ज्याचे आचरण केल्याने ऐहिक अभ्युदय होतो आणि कैवल्याची प्राप्ती होते त्याला ‘धर्म’ म्हणतात. अहिंसा, सत्य, क्षमा, दान, पूजा, जप, ध्यान, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि दया हे दहा धर्म असून त्यांपैकी दान हा एक धर्म आहे. परंतु दान हा केवळ धर्म नसून एक कर्तव्य देखील आहे. धार्मिक होण्यासाठी दान केले पाहिजे. दान करणारा लोभापासून मुक्त होतो. अतिलोभ हा पापाचा बाप असून दान हे धर्माचे मूळ आहे. तुलसीदासांनी म्हटले आहे:

लोभ पाप का बाप बखाना।
दान धर्मका मूल॥

उपनिषदांत एक कथा आहे. देव, दानव आणि मानव हे ब्रह्मदेवाकडे जाऊन त्याला ‘उपदेश करा’ अशी विनवणी करतात. तेव्हा ब्रह्माने तिघांनाही ‘द’, ‘द’, ‘द’ असा एका अक्षराचा उपदेश केला. देवांनी विचारले,

‘देवा, आम्ही ‘द’ चा काय अर्थ घ्यावा ?’

ब्रह्मदेव म्हणाले, ‘दम’.

देव हे विषयलोलुप, सुरापान करणारे, अप्सराभोगी आहेत म्हणून त्यांना ‘दम’ म्हणजे इंद्रियनिगृह करा असा ब्रह्माने उपदेश केला.

दानवांनी विचारले, ‘आम्ही ‘द’ चा कोणता अर्थ घ्यावा ?’

‘दया’, ब्रह्मदेव उत्तरले. दानव हे स्वभावत: निर्दयी असल्यामुळे त्यांना ‘दया करा’ असा उपदेश मिळाला.

शेवटी मानवांनी विचारले, ‘देवा, आमच्यासाठी ‘द’ चा अर्थ कोणता ?’

‘दत्त’, ब्रह्मदेव उत्तरले. ‘दत्त’ म्हणजे द्या, दान करा. मानव हा स्वभावत: लोभी असल्याने त्याला ब्रह्माने उपदेश दिला.

अतिलोभामुळे ऐहिक आणि पारलौकिक सुखे मिळत नाहीत. म्हणून

लोभाचा त्याग करून दान करायला हवे. दारी येणारा भिक्षू आपल्याला भीक मागायला येत नाही तर शिक्षण द्यायला येतो. 'न देऊन माझ्यासारखे होऊ नका ' असेच तो सांगत असतो. दाता अत्यंत दुर्मिळ असतो.

शतेषु जायते शूर: सहस्रेषु च पंडित:।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा॥

शंभरांत एक शूर, हजारांत एक पंडित, दहा हजारांत एखादा वक्ता तर दाता मात्र अत्यंत दुर्लभ असतो. तो असेलच याची शाश्वती देता येत नाही. व्यवहारचतुर, कृपण सगळेच असतात. दानशूर कर्ण एखादाच.

एक मनुष्य अत्यंत कृपण होता. पैशाने श्रीमंत होता, पण मनाने दरिद्री होता. त्याने आयुष्यात कोणाला काही दिले नाही. एवढेच नव्हे तर 'द्या' असा शब्द कोणी उच्चारला तरी तो रागावत असे.

पूर्वी धान्य साठवायला घराखाली एक तळघर असे. त्याला 'पेव' म्हणत. या पेवाचे तोंड बऱ्याचवेळा रस्त्याकडे असे. तो कृपण मनुष्य रस्त्याने जाताना अशाच एका पेवात पाय घसरून पडला. त्याला बाहेर येता येईना. मग त्याने ओरडायला सुरुवात केली,

'मला कुणीतरी बाहेर काढा हो.'

बऱ्याच लोकांनी आवाज ओळखला. त्याच्याकडे दुर्लक्ष करून ते पुढे गेले. एका सज्जन गृहस्थाला दया आली. माणसाला माणसानेच मदत करायला हवी, तो कसा का असेना. त्याच्या प्राणावर बेतले. मदतीची याचना करतो आहे, असा विचार करून त्याने पेवाच्या तोंडाजवळ जाऊन म्हटले,

'अहो, तुम्हाला मी बाहेर काढतो. तुमचा हात द्या पाहू.'

'हात द्या' म्हणताच त्या कृपण माणसाचे डोके फिरले. त्याला 'द्या' असा शब्दच सहन होत नसे. तो म्हणाला,

'जा, देत नाही. तुला काय करायचे ते कर . मी आयुष्यात कुणाला काही दिले नाही. मग तुला कशाला देऊ ?'

सज्जन गृहस्थाला कळेना की या माथेफिरू माणसांला मदत कशी करावी? शेवटी त्याला युक्ती सुचली. आपला हात पेवात सरकवून तो म्हणाला,

'बरं, देऊ नका. आता माझा हात घ्या.'

'घ्या' असे ऐकताच कृपण माणसाने पटकन् त्याचा हात पकडला.

या कथेत थोडा अतिशयोक्तीचा भाग असेल. परंतु आपण थोड्याफार फरकाने असेच असतो. इतरांना सहज, त्याला कळणार नाही अशा रीतीने फसवून लुबाडतो आणि या प्रकाराला 'व्यवहार' असे गोंडस नाव देतो. बऱ्याचदा आपण केलेले दान देखील 'व्यवहारा' चा भाग असतो. तरीही न देण्यापेक्षा 'देणे' केव्हाही चांगलेच. दान केल्याने मन विशाल होऊन 'वसुधैव कुटुंबकम्' ही भावना जागृत होते. मन विशाल झाल्यशिवाय परमात्म्याची प्राप्ती होणार नाही. परमात्मा व प्रकृती हे दानशूर असून भूमीला एक धान्यबीज अर्पण केले तर ती त्याची हजारो पटीने परतफेड करते. परमात्मा हा उदार व दानशूर असल्यामुळेच त्याला साऱ्या जगाचा दाता म्हटले जाते.

ईश्वराने निर्मिलेली सृष्टी ही केवळ आपल्या एकट्याचीच मानणे म्हणजे स्वार्थ असून दान हे स्वार्थापलीकडे पहायला शिकविते. हृदय विशाल करण्यासाठी, सर्व जग हे एक कुटुंब आहे ही भावना जागृत करण्यासाठी आणि परमात्म्याच्या जवळ जाण्यासाठी दातृत्वभावना जोपासणे आवश्यक आहे.

पहिली आणि शेवटची भाकरी घरच्यांनी खाऊ नये ही एक जुनी पद्धत असून याचा अर्थ अन्नदान करणे हाच आहे. आपल्या संपत्तीत धर्म, राजा, चोर आणि अग्नी हे चार वाटेकरी आहेत. धर्मरूपी दान न केल्यास मानवाची संपत्ती बाकीचे तिघे वाटेकरी हरण करतील म्हणून थोडया प्रमाणात तरी दान करणे आवश्यक आहे. दान या सहज धर्माचा थोडा वाटा प्रत्येकाने उचलला पाहिजे.

दानामुळे 'हे माझे' असा ममत्वभाव दूर होतो. आपण जेवढे देऊ तेवढे सोन्याचे होते.

रस्त्याच्या कडेला एक भिकारी उभा होता. दुरून त्याच्या दिशेने राजाचा रथ येऊ लागला. भिकाऱ्याला वाटले आता राजा आपल्याला काहीतरी देणार. त्याच्या मनात आशांकुर फुलले. रथ जवळ आला, थांबला. राजा खाली उतरला. भिकाऱ्याच्या दिशेने येऊ लागला. भिकाऱ्याने हात पसरायची तयारी सुरू केली.

पण ? भिकाऱ्याऐवजी राजानेच भिकाऱ्यासमोर हात पसरला. भिकारी

मनातल्या मनात चिडला, संतापला. त्याने आपल्या झोळीत हात घालून मोठया अनिच्छेने जोंधळ्याचे दोन दाणे बाहेर काढले. राजाच्या ओंजळीत टाकले. राजा हसला, रथात बसला. रथ दूर निघून गेला.

भिकारी राजावर संतापून झोपडीत आला. ज्याने द्यायचे त्यानेच मागायचे म्हणजे काय? असा विचार करून त्याने रागारागाने झोळी जमिनीवर फेकली. सगळे जोंधळे खाली सांडले. भिकारी पाहतो तो काय? त्यातले दोन दाणे सोन्यासारखे चमचमत होते. हावरेपणाने त्याने हाती घेऊन पाहिले. होय, सोन्याचे दाणेच! फक्त दोन. मग त्याला पश्चाताप झाला की राजाच्या ओंजळीत सर्वच जोंधळे घातले असते तर?

आपण जेवढे देऊ तेवढे सोन्याचे होणार. अधिक नाही. म्हणून दातृत्वभाव, दानवृत्ती जोपासणे आवश्यक आहे. ज्याला आयुष्य सोन्याचे करून घ्यायचे आहे त्याने दानाची वाट कधी सोडू नये.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# सहजदान

जिज्ञासू सद्भक्तांनो,

सृष्टी ही शिवनिर्मित असून त्याने ती सर्व जीवात्म्यांना दान केली आहे. या दानात प्रतिफलाची भावना नाही. भेदबुद्धी नाही. सर्व विश्व मीच आहे असा अभेदभाव शिवाच्या ठिकाणी नांदतो, त्याप्रमाणे सहजदान करणाऱ्याच्या ठिकाणी हाच अभेदभाव असतो म्हणून सहदानी हा साक्षात् शिवस्वरूपच असतो. 'सिद्धान्तशिखामणी'त सोपाधिक दान, निरुपाधिक दान आणि सहजदान असे दानाचे तीन प्रकार सांगितले आहेत:

दानं च त्रिविधं प्रोक्तं सोपाधिनिरुपाधिकम्।
सहजं चेति सर्वेषां सर्वतंत्रविशारदैः॥ १-७०॥

देणारा, घेणारा आणि देयवस्तू हा भेद सहजदानात शिल्लक राहत नसल्यामुळे सर्व दानांत सहजदान श्रेष्ठ होय. कोणी संपत्तीची वृद्धी व्हावी म्हणून तर कोणी नावलौकिक मिळावा म्हणून दान करतो. धन-मान इत्यादी अपेक्षेने केलेले दान हे सोपाधिक दान होय. कोणतीही उपेक्षा न ठेवता केवळ कर्तव्यबुद्धीने केलेले दान हे निरुपाधिक दान होय. उपनिषदात वित्तेषणा, पुत्रेषणा व लोकेषणा असे इषणत्रय सांगितले आहेत. या तिन्हींपासून मुक्त असलेले ते निरुपाधिक दान परंतु देणारा, घेणारा व देयवस्तू यांमध्ये जेव्हा भेद राहत नाही अशावेळी घडणारे दान हे सहजदान असून ते सर्वश्रेष्ठ आहे. देणारा शिव, घेणारा शिव आणि देयवस्तूही शिवच ही अभेदभावना या दानात जागृत असते. उजव्या हातातील रुपया डाव्या हातात ठेवला तर त्याठिकाणी देणे-घेणे हा भाव जसा उत्पन्न होत नाही, त्याप्रमाणे सहजदानातही भेदवृत्ती राहत नाही. सहजदानाची अत्युत्तम कल्पना 'सिद्धान्तशिखामणी' शिवाय अन्य कोणत्याही ग्रंथात नाही. देणारा, घेणारा, दान हे सर्व शिवरूपी आहे, असे शिवभावाचे चिंतन करीत अकर्तृत्व भावनेने केलेले दान सहजदान होय:

अदातृदातृदेयानां शिवभावं विचिन्तयन्।
आत्मनोऽकर्तृभावं च यद्दत्तं सहजं भवेत्॥ ९-८३ ॥

अभेदभावाने केलेले दान हे जसे सहजदान आहे, तसेच शिवाला अथवा शिवयोग्याला अत्यंत भक्तिभावाने कोणतीही वस्तू अर्पण करणे हे देखील सहजदान आहे. दान सत्पात्री अर्थात योग्य व्यक्तीला करावे लागते. शिव हा जगद्गुरू व सर्व विद्यांचा निधी असल्यामुळे तो सर्वश्रेष्ठ सत्पात्र आहे. त्याप्रमाणेच शिवस्वरूप व शिवज्ञानाचा सागर असलेले शिवयोगी हे देखील सत्पात्र आहेत. ते सर्व भुतांना आत्मरूपात पाहत असल्याने त्यांना केलेले दान हे सर्व विश्वाला केलेले दान होय. शिवाला एक फूल वाहिले तर सत्पात्राला एक सहस्र सुवर्णमुद्रा दान केल्याइतके पुण्य लाभते. शिवयोग्याचा शिवाशी निरंतर संबंध असतो. त्याला एक घासभर अन्न दिले तर कोटी यज्ञ केल्याचे फळ मिळते. एक शिवयोगी तृप्त झाला तर शिव तृप्त होतो आणि शिव तृप्त झाल्याने चराचर विश्व तृप्त होते. म्हणून प्रयत्नपूर्वक शिवयोग्याची तृप्ती करावी, असे 'सिध्दांतशिखामणी'त सांगितले आहे:

शिवयोगिनि संतृप्ते तृप्तो भवति शंकरः।
तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चराचरम्॥९-९१॥

एक गरीब ब्राह्मण होता. घरात अठरा विश्वे दारिद्रय. रोज खायची भ्रांत. एकेदिवशी त्याला समजले की जवळच्या नगरात धर्मक्रेता नावाचा एक श्रीमंत गृहस्थ राहतो. तो पैसे देऊन पुण्य विकत घेतो. ही गोष्ट ब्राह्मणाने सहज आपल्या पत्नीला सांगितली. तेव्हा तिने त्याच्यामागे टुमणेच लावले,

'तुम्ही जा. त्या श्रीमंताला तुमचे पुण्य विकून द्रव्य घेऊन या. आपली रोजची ददात तरी मिटेल'.

ब्राह्मणाने काही दिवस तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. अखेर एकेदिवशी सोबत शिदोरी घेऊन तो नगराकडे निघाला. चालता चालता दुपार झाली. वाटेवर एक विहीर आणि झाडाची सावली पाहून तो थांबला.

शिदोरी सोडून जेवायला बसला.

तेवढ्यात एक कुत्री आपल्या लहान लहान पिलांसह तेथे आली. त्याच्याकडे, त्याच्या समोरील अन्नाकडे आशाळभूतपणे पहात बसली. तिचे भुकेले डोळे आणि तिची पिलावळ पाहून त्याला घास जाईना. त्याने भाकरीचा एक तुकडा त्यांच्यापुढे फेकला. तो चटकन् तिने खाल्ला. दुसरा फेकला. पिल्लांनी खाल्ला. असे करता करता सगळी शिदोरी संपली. ब्राह्मण उपाशीच राहिला. पाणी पिऊन त्याने आपले पोट भरून घेतले.

उरलेला प्रवास संपवून तो नगरात आला. धर्मक्रेताच्या वाड्यात गेला. त्याचे स्वागत झाले. पुण्य विकायची इच्छा त्याने दर्शविली. तेव्हा श्रीमंत म्हणाला,

'तुमच्या पुण्याचे मूल्यमापन माझी पत्नी करील, पुण्य किती आहे अन् त्याचे मोल किती द्यायचे हे सारे माझी पत्नी बघते.'

श्रीमंताची पत्नी आली आणि ब्राह्मणाकडे पाहून पतीला म्हणाली,

'हा ब्राह्मण जर आज दुपारी मिळवलेले पुण्य विकत असेल तर ते एक लक्ष सुवर्णमुद्रा देऊन घ्या.'

'विकणार का आज दुपारचे पुण्य?' श्रीमंताने विचारले. ब्राह्मणाला आज आपण कोणते पुण्यकर्म केले ते उमजेना. तो गोंधळला. श्रीमंत पुन:पुन्हा विचारीत होता. ज्याची किंमत एक लक्ष सुवर्णमुद्रा आहे ते पुण्य विकावे की नाही? या संभ्रमात तो पडला शेवटी म्हणाला,

'आजचे पुण्य विकायचे की नाही हे मी माझ्या पत्नीला विचारून येतो.'

ब्राह्मण परत फिरला. येताना त्याला जेथे कुत्रीला शिदोरी दिली ते ठिकाण लागले त्याला भीती वाटली की रिकाम्या हाताने परत फिरलो तर आपली पत्नी रागावणार म्हणून त्याने जिथे कुत्री बसली होती तेथील चारसहा दगड उचलून शिदोरीच्या वस्त्रात बांधले. डोक्यावर गाठोडे घेऊन घरी आला. ते कोपऱ्यात फेकले. दूर जाऊन बसला.

'पुण्य विकून धन आणले?' पत्नीने विचारले.

त्याने फक्त मान हलविली आणि गाठोड्याकडे बोट दाखविले. आतले दगड पाहून ती आक्रस्ताळेपणा करणार हे त्याला माहीत होते. म्हणून तिच्याकडे पाठ करून तो बसला.

तिने गाठोडे उलगडले आणि हर्षातिशयाने ओरडली, 'काय, इतके

सोने आणले? तुम्ही सगळे पुण्य विकले की काय?'

त्याने चमकून वळून पाहिले. शिदोरीच्या वस्त्रात सोन्याच्या लगडी चमचमत होत्या!

सामान्य पशूला अन्नदान केल्याचे हे फल तर शिवयोग्याला दान केल्याचे किती फल असेल? म्हणून वीरशैवांनी जंगमाला, शिवयोग्याला दान करून संतुष्ट करावे.

शिवत्वाच्या प्राप्तीसाठी साधक योगादी कठीण साधना करतात. परंतु सहजदान केल्याने हे शिवत्व सहज प्राप्त होते. म्हणून सहजदान श्रेष्ठ होय. सहजदानाने सर्व भुतांना समान लेखणारी समदृष्टी लाभते. समष्टिभाव उत्पन्न होतो आणि साधक शिवस्वरूप होतो. निसर्ग एवढा दानशूर आहे. परंतु त्याची वाच्यता तो कधी करीत नाही. त्याचप्रमाणे दानी पुरुषाने केलेल्या दानाची वाच्यता कधी करू नये. अन्नदान, वस्त्रदान, सुवर्णदान, भूदान, गोदान, शय्यादान, कन्यादान, विद्यादान, दीपदान इत्यादी विभिन्न वस्तूंचे दान करावे, असे शास्त्रात सांगितले आहे. जगात अशी कोणतीही वस्तू नाही की, जिचे दान केले जाणार नाही. आधुनिक काळात नेत्रदान, रक्तदान, देहदान इत्यादी दानेही दिली जातात. जुन्या धर्मशास्त्रात सांगितलेली नसली तरी ही दाने काळाशी सुसंगत आहेत, म्हणून ती महत्त्वाची असून त्याचाही दानप्रकारांत समावेश करायला पाहिजे. सहजदान करण्याची योग्यता अंगी आल्याशिवाय मनुष्य 'भक्त' या संज्ञेला पात्र होत नाही.

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

# 'ज्ञानयुगा'कडे

जिज्ञासू सद्भक्तांनो,

आजचे युग हे विज्ञानयुग आहे असे म्हटले जाते. पृथ्विकक्षेबाहेर अखंड भ्रमणारे उपग्रह या विज्ञानयुगाची साक्ष देतात. म्हणून जुने ते सगळे कालबाह्य झाले असे समजायचे का? हजारो वर्षे झाली तरी मानवाचा देह आहे तसाच आहे. त्यात कुठे परिवर्तन झाले? माणसाचे मन, त्यातील विकार, भावना सारे काही तसेच आहे. विज्ञानयुगात माणूस काही अंतर्बाह्य बदलून गेला नाही. त्याच्यासाठी विज्ञानाने भरभरून भौतिक सुखे आणली, त्याबरोबर दारिद्र्य, आजार आणि विनाशाचे सावटही आणले. पर्यावरणाच्या संतुलनाची कधी केली नसेल एवढी चिंता विज्ञानयुगात करायची वेळ आली आहे. अंमली पदार्थांच्या आहारी गेलेली आणि शारीरसुख हेच सर्वस्व मानणारी संस्कारशून्य तरुणपिढी ही काही धर्मग्रंथांची निर्मिती नाही. असलीच तर ती आजच्या विज्ञानयुगाची आहे. 'विज्ञानयुगा'चा घोष करता करता आपण 'ज्ञानयुगा'चा उच्चार करायचे देखील विसरून गेलो.

जर हजारो वर्षांत माणसाचे मन बदलले नसले तर त्या मनावर संस्कार करणारे धर्मसाहित्य कालबाह्य कसे ठरते? मनुष्य धर्माचरण टाळण्याचाच नेहमी प्रयत्न करतो. अगदी महाभारतकाळात देखील 'मी बाहू वर करून लोकांना ओरडून सांगतो की बाबांनो, धर्माचरण करा. पण माझे कोणी ऐकत नाही' अशी तक्रार व्यासांनी केलेली आहे.

दोष धर्माचा आणि धर्मग्रंथाचा नाही. धर्माचरण टाळणाऱ्यांचा आणि धर्माच्या नावावर स्वार्थ साधणाऱ्यांचा आहे. मनुष्याची बुद्धी ऐहिक आणि जड झालेली आहे. माणूस ईश्वराकडे उत्कट भक्तिभावाने जात नाही. जातो तो काहीतरी ऐहिक गोष्ट मागायला एरवी ईश्वर आहे हे मान्य करायला देखील तो तयार नसतो.

एक मनुष्य एका वृद्ध गुरूकडे गेला. म्हणाला, 'आपण ज्ञानी आहात. मला ईश्वराचे दर्शन घडवा.'

गुरू फक्त हसले. परंतु त्या मनुष्याने 'ईश्वर दाखवा' असा सारखा त्यांच्यामागे लकडा लावला.

एके दिवशी गुरू त्याला घेऊन नदीवर गेले. तो नदीत स्नानासाठी उतरला तेव्हा गुरूंनी त्याला पाण्याखाली काही वेळ दाबून धरले. तो कासावीस झाला. थोड्या वेळाने त्याला सोडून गुरूंनी विचारले,

'तुला पाण्याखाली कोणत्या गोष्टीची अत्यंत गरज भासली ?'

'श्वास घेण्यासाठी हवेची' त्याने उत्तर दिले.

'मग अशीच जेव्हा तुला ईश्वराची अत्यंत उत्कटपणे गरज भासेल तेव्हाच त्याचे दर्शन घडेल.' गुरू हसून म्हणाले.

'ईश्वर दाखवा' म्हणणारे असेच निरसपणे बोलत असतात. त्यांना ईश्वराची खरी गरज असतेच कोठे? ईश्वराकडे जाणारी वाट आपल्याला धर्मग्रंथ दाखवतात. ईश्वर हे सत्य आहे. सत्य कधी जुने होत नसते, कालबाह्य होत नसते. गुरुत्वाकर्षण या सत्याचा शोध न्यूटनने लावून बराच काळ उलटला. मग ते जुने झाले ? की कालबाह्य झाले ?

'सिद्धान्तशिखामणी' या ग्रंथात षट्स्थल सिद्धान्ताचे विवरण आहे. हा साधकाचा आध्यात्मिक प्रवास आहे. त्याच्या अंतर्यामी घडणाऱ्या स्थित्यंतरांची ही अचूक नोंद आहे. भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य अशा या सहा पायऱ्या. शेवटची पायरी म्हणजे मुक्ती. जन्ममृत्यूचा शेवट. त्यालाच लिंगांगसामरस्य असे पारिभाषिक नाव आहे. साधक हळूहळू एकेक पायरी चढत ऐक्यस्थलापर्यंत पोहोचतो तेव्हा तो मुक्त होतो. दुधात दूध आणि पाण्यात पाणी एकजीव व्हावे तसा जीव हा शिव होऊन जातो. मनुष्यजन्माचे सार्थक शिव होण्यात आहे. पण त्याआधीची पहिली पायरी 'भक्तस्थल' आहे. भक्त झाल्याशिवाय मुक्त होता येणार नाही. या भक्तस्थलाचेच विवेचन आम्ही आतापर्यंत केले.

साधक शुद्धाचरण स्वीकारून जेव्हा भक्तस्थलात पाऊल ठेवतो तेव्हाच त्याची ज्ञानयुगात वाटचाल सुरू होते. हे ज्ञानयुग त्याच्यासाठी, त्याच्यापुरते असते. त्याचा जन्म हा अखेरचा ठरल्याची ती नांदी असते. देव आणि भक्त एकच असा साक्षात्कार होऊन तो कृतार्थ होतो. त्याला उमगते की देव आणि देऊळ भिन्न नाहीत. मग मन्मथस्वामींच्या शब्दांचा तो अखंड प्रत्यय घेत राहतो :

देऊळा आधार देवाचाचि झाला। देवळाने केला देव उभा ॥
देवे आणियेली देवळासी शोभा। देवळाची प्रभा देवावरी ॥
तंतुमाजी शेला शेल्यामाजी तंतू। एक एकाआंतु एकपणे ॥
सद्गुरू प्रसादे मन्मथे देखिले। दोन्ही भाग ठेले एकरूप ॥

॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

तीच सुखे, तीच दुःखे.
तसेच उगवणे, तसेच मावळणे.
तेच हसणे, तेच रडणे.
कधीतरी माणूस कंटाळतो.
थकतो तीच ती वाट चालून.
अंतर्मुख होऊन विचार करतो
असेच का सारखे फिरत राहायचे
आपण ?
घाण्याला जुंपलेल्या बैलासारखे.
मग तो शोध घेऊ लागतो.
शाश्वत मूल्यांचा.
मनात भक्तीचा कोवळा अंकुर फुलतो
आणि त्याची वाटचाल सुरू होते
महन्मंगल, शांतस्वरूप
परशिवाच्या दिशेने.
त्याची पुढे पुढे पडणारी पावलेच
ठरवतात
'जन्म हा अखेरचा'.

जीवाच्या अखेरच्या जन्माचे स्वरूप
आणि रहस्य विशद करीत आहेत
प.पू.श्रीकाशीजगद्गुरूंच्या
अमृतवाणीतून प्रकटलेली
ही प्रासादिक आणि चिंतनगर्भ
आशीर्वचने.
'जन्म हा अखेरचा!'